# भारती

## तीन अंकी नाटक

नाना जोग

प्रकाशक

विदर्भ साहित्य संघ, नागपूर

किंमत दीड रुपया

श्री. नाना जोग यांचें ' भारती ' हें तिसरें नाटक. ' चित्रशाळा ' व ' सोन्याचे देव ' या आपल्या दोन नाटकांनी श्री. जोग यांनी नवनाट्यामध्ये मानाचें स्थान मिळविलें आहे. त्यांची ही तिसरी कलाकृति त्यांच्या कीर्तीमध्ये निःसंशय भर टाकील. ' भारती ' मधील नाट्यवस्तु व नाट्यतंत्र या दोहोंतहि नाविन्य आहे. जितकें नाविन्य आहे, तितकेंच अर्थगांभीर्यहि आहे. श्री. जोग यांचा मनोविश्लेषणशास्त्राचा चांगला अभ्यास आहे. या व्यासंगाचा त्यांनी प्रस्तुत नाटकांत मोठ्या सहृदयपणें उपयोग केला आहे.

भारती'चा जन्म विदर्भ साहित्य संघाच्या उत्कर्षासाठी झाला, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. विदर्भ साहित्य मंदिराच्या नाट्यगृहासाठीं ती प्रथम रंगभूमीवर येत आहे. त्याच वेळीं तिचें ग्रंथरूपाने प्रकाशन व्हावें, हे उचितच. या प्रकाशनाची संधि लाभल्याबद्दल विदर्भ साहित्य संघाला अत्यंत अभिमान व आनंद वाटतो. ही संधि लेखकाच्या विदर्भ साहित्य संघाविषयींच्या आपुलकीमुळेच लाभत आहे.

आपल्या नाटकाच्या या पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनाचा अधिकार कोणत्याहि तऱ्हेचें प्रतिमूल्य न घेतां संघाला दिल्याबद्दल विदर्भ साहित्य संघ श्री. जोग यांचा अत्यंत ऋणी आहे. संघाच्या मदतीसाठी या नाटकाचे इतरत्र जे प्रयोग होतील त्यांच्यासाठी श्री. जोग यांची संमति विदर्भ साहित्य संघाच्या मार्फत घ्यावी लागेल.

**कुसुमावती देशपांडे**
अध्यक्ष, विदर्भ साहित्य संघ.

# या नाटकांतील पात्रें

( प्रवेशानुक्रमें )

| | | |
|---|---|---|
| भारती | : | मार्तंडरावांची द्वितीय पत्नी |
| कुमार | : | मार्तंडरावांचा मुलगा |
| रसिकलाल | : | कुमारचा मित्र |
| मार्तंडराव | : | मोडकळीस आलेले एक इनामदार |
| डॉक्टर | · | मनोविश्लेषणज्ञ |

# १

[ पडदा वर जातो. १९५० साल उजाडण्याचा सुमार. या सुमारास मोडकळीस आलेल्या मार्तंडराव इनामदारांच्या उर्वरित 'वाड्या'चा दिवाणखाना. वीस–बावीस वर्षांपूर्वी आधुनिक समजलें गेलेलें फर्निचर, सोफासेट, तख्तपोस, एक उंच कपाट, पुस्तकांचें रॅक इत्यादि कोंबल्यासारखें लावलें आहे. मागील भिंतीच्या दोन्ही कोंपऱ्यांत एकेक दरवाजा आहे. त्यांतला उजवा बाहेर जाण्याचा, डावा मार्तंडरावांच्या खोलीचा. दोन्ही बाजूंच्या भिंतींत एकेक दरवाजा व एकेक खिडकी आहे. खिडक्या अलीकडे आहेत. उजव्या भिंतींतील दरवाजा कुमारच्या खोलीचा व डाव्या भिंतींतील दरवाजा घरांत जाण्याचा. जमिनीवर हरणांचीं व चित्त्यांचीं जुनीं कातडीं. खिडकी–दरवाज्यांवर पडदे. भिंतींवर देव–देवतांच्या तजबिरी व या घराण्याच्या 'मूळ पुरुषां'चे एकदोन मोठे फोटो, आणि 'टक्कल' पडलेलीं हरणांचीं मुंडकीं व एकदोन कॅलेंडरें. समोरच्या उजव्या कोंपऱ्यांत ड्रॉअर असलेलें लिहायचें टेबल–खुर्ची. त्याच्याच शेजारीं आपल्याकडे पाठ असलेला ऑर्गन. ऑर्गनच्या डावीकडे एक स्टूल, स्टुलावर ट्रे आणि ट्रेमध्ये लोंकरीचे दोन गुंडाळे. ऑर्गनसमोर आपल्याकडे तोंड करून बसलेली, जरा वेडसर दिसणारी तरुणी–भारती– ऑर्गनवर स्वतःची साथ करून गुणगुणते आहे. तिच्या स्वरांचें

नोटेशन केल्यास 'ध नि सा प, ध नि म रे, सा प म रे, ग ध म रे, सा रे म रे, ग' असें होईल. तिची दृष्टि शून्यांत खिळली आहे गुणगुणत असतांना मध्येच ती लोंकरीचा कोणता तरी एक गुंडाळा उचलून लोकर गुंडाळूं लागते. हा प्रकार चालला असताना वास एकवीस वर्ष वयाचा कुमार प्रवेश करतो. त्याच्या मागोमाग रसिकलाल प्रवेश करतो. कुमारपेक्षा तो २/३ वर्षांनी मोठा आहे व जास्त देखणा आहे, किंचित् स्थूलहि आहे. दोघांच्याहि हातांत पुस्तकें आहेत. त्याशिवाय रसिकलालच्या हातांत टेनिस-रॅकेटहि आहे. रसिकलालचे कपडे उंची आहेत. प्रवेश करतांच दोघेंहि आपापलीं पुस्तकें दरवाज्याजवळच्या छोट्या टेबलावर आदळतात. त्याबरोबर भारती पुन्हा ऑर्गनवर आपली साथ करूं लागते. दोघेहि बाहेरून बोलत आले आहेत तेंच बोलणे चालू ठेवत कुमार समोर येतो व कोचावर धाडकन् बसतो. पण रसिकलाल गाण्याचा षौकी असल्यामुळे भारतीपासून थोड्या दूर अंतरावर मागे उभा राहून तिचे आलाप ऐकतो. कुमारची टकळी चालूच असते. रसिकलाल तिकडे लक्ष देत नाही. भारतीचेंहि गुणगुणणें कांहीं वेळ चालूच असतें. तिच्या कपाळावरचें कुंकू कालमानानें थोडें ठळकच आहे. गळ्यांत मंगळसूत्र वगैरे कांहीं नाही. साडी, ब्लाउझ अगदीं बाळबोध, थोडें अस्ताव्यस्त आहे. ती आपला पदर या दोघांच्या आगमनानंतरहि सावरीत नाही. ]

**कुमार :** (पुस्तकें आदळून) हे आमचे प्रोफेसर !–आम्हाला हे ज्ञान शिकवणार ! शेण खातात ते खातात न् वरून त्याला गोंडस नांव देतात ! बौद्धिक भूक म्हणे ! बुद्धीला एवढी खायखायच सुटली होती तर पुस्तकाचीं पानं खायचीं असतीं फाडून !–शेण कशाला खायला हवं होतं ? कारे रसिकलाल, ए रसिकलाल ! ( रसिकलाल जागा होऊन कुमारच्या शेजारी येऊन बसतो ) ज्याच्याबद्दल आपल्याला खराखरा आदर वाटेल, एखाद्या गंभीर प्रश्नावर ज्याचा सल्ला घ्यावासा वाटेल असा एक माणूस दिसत नाही रे आजकाल ! वरपासून खालपर्यंत सगळे

एकसारखे ! ( भारती गुणगुणणें बंद करून लोंकरीचा दुसरा गुंडाळा उचलून लोंकर गुंडाळूं लागते. तिची दृष्टि पूर्ववत् समोरच खिळली आहे. या दोघांच्या संवादाकडे तिचें मुळींच लक्ष नाही असेंच एखाद्याला वाटावें ) रसिकलाल, मला तर अलीकडे असं वाटायला लागलं आहे की आपण सारेच्या सारे लौकरच कुत्र्याच्या मौतीनंच मरणार आहोत !

**रसिक :** ( आपल्या तंद्रींत असल्यासारखा ) एका निराळ्याच अर्थानं टागोरांचंच म्हणणं खरं ठरणार आहे, कुमार ! टागोर म्हणतात, साऱ्या ज्ञानाची अखेर दारूच्या धुंदींत कुत्र्याच्याच गतीनं होत असते ! इट् इज़् द एन्ड ऑफॉल लर्निंग टु बि ड्रंकन् अँड् गो टु द डॉग्ग् ! ( भारती पुन्हा गुणगुणूं लागते ).

**कुमार :** वा ! छान फळ सांगितलं आहे ज्ञानाचं 'गुरुदेवा'नी ! ( विचारमग्न होतो ).

**रसिक :** ( भारतीकडे पाहात असतो. तिच्या गळ्यांतून सुंदर पंचम लागतांच मानेला एक झटका देतो व स्वराचा गोड चटका लागल्यासारखा ) अहा ! काय आवाज चिकटतो रे स्वराला ! हाऊ डिव्हाइन् ! ( थोडा थांबून उसासा टाकीत ) व्हॉट् अ पिटी !

**कुमार :** यस् ! अ हंड्रेड् पिटीज् ! ( तिघेहि स्तब्ध होतात. आपण बोललों ते तिला आवडलें नसेल असे वाटून तिची समजूत घालण्याच्या प्रयत्नांत ) अग ए माई ! रसिकलाल काय म्हणतो तें ऐकलंस कां ( ती अगदीं संथ गतीने सबंध मान त्याच्याकडे फिरवून थिजलेल्या डोळ्यांनी त्याच्याकडे पाहूं लागते ) हा म्हणतो तुझा आवाज अगदीं डिव्हाईन् आहे ! परवां काय म्हणाला होतास तूं रसिकलाल ? गोल्डन्, नाही कां ? ( ती पुन्हा पूर्ववत् समोर पाहूं लागते )

**रसिक :** ( भारतीला ) खरंच डिव्हाइन आहे बरं, म्हणा म्हणा, म्हणा ! ( तिच्यावर कांही परिणाम होत नाही. थोड्या वेळाने किंचित् खिन्न स्वरांत कुमारला दटावतो ) बघ कुमार, सगळा मूड घालवलास तूं कार्कीचा !

[ तोंच बावन-त्रेपन वर्षं वयाचे मार्तंडराव आपल्या खोलींतून प्रवेश करतात. ते किंचित् काळजींत असल्यासारखे दिसतात. त्यांच्या अंगांत शर्ट व धोतर आहे. त्यांचा समोरचा एक दांत पडलेला आहे. त्यांची चाहूल लागतांच भारती चटकन् उठते व

ऑर्गनसमोर पडलेले दोन तीन कागद ड्रॉअरमध्ये टाकून त्याला कुलुप लावते, किल्ल्या कनवटीला खोचते व नाकासमोर पाहत संथ गतीने घरांत जाते ]

**मार्तंड :** ( रसिकलाल त्यांना पाहून उभा होतो व हात जोडतो त्याला ) अरे रसिकलाल! आतां तूं इंग्लंडला जाणार—मोठा माणूस होणार–( थोड्या लाघवी आवाजांत ) आता जर यापुढं तूं मला हें असं नमस्कार करणं बंद करणार नाहीस, तर तुझ्याशीं बोलणंच टाकावं लागेल मला!

**कुमार :** ( रसिकलाल त्याच्याकडे स्मित करून पाहत उभा असतो ) जित्याची खोड आहे ही त्याची! तुम्हीच हार खाल, बाबा!

**मार्तंड :** अरे, इतक्या वर्षांच्या परिचयानंतर—खाली बस पाहूं अगोदर—

**कुमार :** ( दोघेहि खालीं बसत असतां ) त्याला भीति वाटते, बाबा, की आपल्या हातून दुसऱ्याची अतिपरिचयात् अवज्ञा झाली तर दुसरेहि आपला अनादर करायचे! आपल्या हातांनी आपला मान राखून घेण्याचं तंत्र आहे हे त्याचं! आहे की नाही, रसिकलाल?

**रसिक :** ( गमतीनें ) चुप रहाना कुमार! फार शिष्ट झाला आहे हा, काकाजी, आता एम्. ए. झाल्यापासून!

**कुमार :** ( गालांतल्या गालांत हसत ) हुं!

**मार्तंड :** मला तर आश्चर्यच वाटतं, कुमारसारख्या उद्धट माणसाशीं तुझी मैत्री इतकीं वर्षं टिकलीच कशी!

**रसिक :** त्यांत आश्चर्य कसलं! परस्परविरुद्ध ध्रुवांना नाहीं कां वाटत एकमेकाविषयी आकर्षण! तसाच प्रकार असेल हा! ( हंसतो )

**कुमार :** पण मी स्वानुभवावरून सांगतो, बाबा, उद्धटपणानं वागणंच अखेर फायदेशीर ठरतं! कारण त्यामुळं आपल्यापासून कोणी सद्वर्तनाची अपेक्षा करीत नाही न् अपेक्षाभंगाचा धक्काहि कोणाला बसत नाही! अहो, जन्मभर चांगलं वागणाऱ्या माणसाकडून एकदा जरी नजरचूक झाली ना, तर लोक लागलीच म्हणायला कमी करत नाहीत—"अरे बेटा, दिसतो तेवढा साळसूद नाहीं हं!"—याच्या उलट माझ्या हातून नजरचुकीनं कधी सद्वर्तन घडलंच, तर



मार्तंडराव : अरे रसिकलाल! आता तू इंग्लंडला जाणार—मोठा माणूस होणार—

लोक तेवढंच कौतुक करतात,—" आहे, आहे, बराच सभ्य आहे! अगदीच काही हा नाही!"

**रसिक :** (घड्याळाकडे पाहून) कुमार, पुरे कर ना तुझं हें थोर नीतिशास्त्र! चलत नाहीस कां तू? (उठून उभा होत) अरे, मिळाला तर पाहूं तरी एखादा सेट अंधार होण्यापूर्वी—चल ऊठ! अन् तुला यायचं नसेल—

**मार्तंड :** रसिकलाल, कुमारशीं थोडं काम आहे माझं—कुमार,—

**रसिक :** मग मी जातो, काकाजी—काय, कुमार?

**कुमार :** बरं तूं चल पुढं—आलोंच मी—काय काम आहे बाबा?

[रसिकलाल रॅकेट फिरवीत जातो. जाण्यापूर्वी मार्तंडरावांना नमस्कार करायला विसरत नाही. मार्तंडराव स्मित करतात.]

**मार्तंड :** (संशयाच्या नजरेने घरांतल्या दरवाज्याकडे एक नजर टाकून) कुमार, (घुटमळत खिशांतून एक रजिस्टर्ड लेटरचें पाकीट काढीत) तुला एक वाईट बातमी सांगायचा प्रसंग आला आहे माझ्यावर—

**कुमार :** (काळजीच्या आतुरतेने) कसली बातमी?

**मार्तंड :** (थोड्या भीतिग्रस्त आवाजांत, घुटमळत) तूं रागावशील कुमार, माझ्यावर?

**कुमार :** (अगदी स्वाभाविकपणें) हे मी अगोदर कसं सांगूं? काय झालंय तरी काय?

**मार्तंड :** (पाकीट त्याच्यापुढे टाकतात) ही नोटीस वाच. (फेऱ्या घालूं लागतात. कुमार वाचत असतो. थोड्या वेळाने एका बाजूला बसून तोंड झाकून घेतात).

**कुमार :** (धक्का बसल्यासारखा मधेच) आं? लग्नासाठी कर्ज काढलं होतं? इतकं?

**मार्तंड :** (निश्वास सोडून) खरं आहे, कुमार!

**कुमार :** (उरला मजकूर घाईघाईने वाचून नोटीस त्यांच्यावर भिरकावीत) कशाला दाखवलीत ही नोटीस तुम्ही मला? नसती दाखवलीत तर काय बिघडणार होतं? (बेचैन झाल्यासारखा फेऱ्या घालूं लागतो).

**मार्तंड :** खरेदमिल शेठजींनी गहाणपत्रावर तुझी संमति मागितली आहे—शिवाय आपली सारी मालमत्ता माझी स्वकष्टार्जित नाही—माझ्या एकट्याच्या मालकीची नाही, कुमार !

**कुमार :** असं !—म्हणजे तशी असती तर तुमचं हें शतकृत्य तुम्ही माझ्यापासून जन्मभर लपवून ठेवलं असतं, नाही?—ठीक आहे ! माझ्या संमतीवाचून आता अडणार आहे तर मी मुळीच देणार नाही माझी संमति या असल्या गहाणाला !

**मार्तंड :** पण मग शेठजी या कर्जाच्या वसूलीसाठी दावा केल्याशिवाय रहाणार नाहीत—त्यांनी स्पष्ट लिहिलं आहे तसं या नोटिसींत. रसिकलालचा बाप म्हणजे रसिकलाल नव्हे, कुमार ! ( नोटीस खिशांत टाकतात ).

**कुमार :** ( दरडावून ) खरं आहे तें !—पण मी म्हणजे तुम्ही नव्हे हेंहि तितकंच खरं आहे ! शेटजींनी दावा केला तरी या घरावरचा माझा हिस्सा मी त्यांना मिळूं देणार नाही !—मलाहि तेवढा कायदा आता समजायला लागला आहे !

**मार्तंड :** चुकतो आहेस तूं कुमार !—लग्नासाठी काढलेलं हें कर्ज व्यावहारिक आहे—तुझ्यावरहि त्याचा बोजा आहे !

**कुमार :** ( संताप अनावर होऊन ) काय म्हणालांत ? हें इतकं कर्ज काढून लग्न करणं व्यावहारिक !—त्या कर्जाचा बोजा पुढच्या पिढीवर टाकणं व्यावहारिक ! वारे व्यवहार ! वारे तुमचा कायदा !

**मार्तंड :** कुमार, हळू बोल—तुझी आई ऐकेल तर आणखी बिथरेल ती—

**कुमार :** ( आवाज जरा उतरवून ) माझी आई ! बिचारी ! (पुन्हा आवेशाने ) बाबा, मी कोणत्याहि बाईला आई मानायला तयार झालो असतों, पण त्याच्यासाठी कायद्याचा हा शाप कशाला हवा होता ?

**मार्तंड :** कुमार, मी तुला कायद्याचा पेंच घालत नाही—आपल्या घराण्याच्या इभ्रतीचाहि प्रश्न आहे इथं ! ( समजुतीच्या स्वरात ) दाव्याच्या थराला गोष्टी येऊं देणं बरं आहे कां ?

**कुमार :** घराणं ! इभ्रत ! एका बाईच्या जिवाचा हा असा बाजार मांडणं आपल्या घराण्याच्या इभ्रतीला शोभलं, नाही कां ? असल्या घराण्याच्या

इश्रनीलाच काय, पण प्रत्यक्ष या घराला आतां आग लागली तरी ती विझवण्याचा प्रयत्न करणार नाहीं मी यापुढं !

**मार्तंड :** कुमार, अशी डोक्यांत राख घालून कसं चालेल ?

**कुमार :** ( संतापाने कांहीं क्षण त्याच्याकडे निरखून पाहून ) मग उद्याच्या उद्या हे घर विका अन् जी रक्कम येईल ती देऊन टाका एखाद्या संस्थेला—मी देतो माझी संमति— आत्ता लिहून घ्या हवी तर !

**मार्तंड :** तें इतकं सोपं नाही आता, कुमार—शेटजींचा फास असानं सोडवतां येणार नाहीं आता आपल्याला !—अन तुझं काय म्हणणं, की त्यांचं कर्ज बुडवून त्यांच्या नरकांत पडावं आपण ?

**कुमार :** ( अगदीं असहाय झाल्यासारखा ) मला कल्पना नव्हती, बाबा, तुम्ही इतके अडाणी, इतके हृदयशून्य असाल अशी !

**मार्तंड :** तूं लावशील ती सारी विशेषणं मान्य करायला तयार आहे मी — पण आता—आता—

**कुमार :** बाबा, हा विषय तुम्ही पुन्हा माझ्याजवळ काढूं नका, अन् तुमच्या पापाचा भागीदार व्हायला मला सांगूं नका ! ( ताडकन् दरवाज्याशीं जाऊन स्वतःचीं व रसिकलालचीं पुस्तकें उचलूं लागतो )

**मार्तंड :** ( आर्जवपूर्वक ) कुमार ! ( कुमार बोलत नाहीं )

[ डॉक्टर विश्वंभर दरवाज्यांत उभे होतात ]

**डॉक्टर :** मार्तंडराव इनामदार घरांत आहेत कां ?

**कुमार :** ( तिरसटासारखा ) कोण तुम्ही ?

**डॉक्टर :** ( एक सेकंद थांबून कुमारच्या आवाजाच्या तोडीचा आवाज काढून रुबाबदार पद्धतीने ) मी विश्वंभर गुरुजी !

**कुमार :** ( एवढ्यांत मार्तंडराव दरवाज्याकडे वळलेले असतात त्यांचा निर्देश करून तुसड्या आवाजांत ) हेच ते— मार्तंडराव !—इनामदार !

[ कुमार पाय आपटत आपल्या खोलींत जातो ]

**मार्तंड :** नमस्कार डॉक्टरसाहेब ! ( त्यांचं स्वागत या झालेल्या बाचाबाचीनंतर कसें करावें तें समजत नसल्यासारखे ) या, आंत या ना.

[ डॉक्टर विश्वंभर प्रवेश करतात. त्यांचें वय साठीच्या घरांतलें. अंगापिंडाने थोडे धिप्पाड, पण विशेष म्हणजे वयाच्या मानाने ताठ. त्यांनी रुबाबदार दाढी वाढवली आहे. डोकीवरचे केसहि बरेच दिवसांत न कापलेले. चेहऱ्याची ठेवण सिंहासारखी. अंगांत साधा सूट्-बूट-जाकिट. हातांत सोटा. तोंडांत पाईप. प्रवेश करतांच या घरांतल्या वातावरणाचें ते बारकाईने निरीक्षण करूं लागतात. बोलतांना आत्मविश्वासाचा तुटकपणा. चटचट गोष्टी समजावून घेण्याची व त्या निकालांत काढण्याची वृत्ति. बोलतांना ते मार्तंडरावकडे पाहतीलच असें नाही. ]

**डॉक्टर :** ( दिवाणखान्यांत उजेड जरा कमी आहे अशा मुद्रेने ) अगोदर दिवा लावा बरं ! ( मार्तंडराव घाईघाईने बटन दाबतात. प्रकाश वाढतो ) थँक् यू ! दॅट्स् राइट् !

**मार्तंड :** ( डॉक्टर उभेच असतात. त्याना समोरच्या कोचाचा अदबीने निर्देश करीत ) असे या इथं बसाना डॉक्टरसाहेब—केव्हा मिळालं माझं पत्र आपल्याला ? काल दोनदा गेलों होतों आपल्या घरीं पण भेट झाली नाही—म्हणून पत्र लिहून ठेवलं !

**डॉक्टर :** ( कोचावर बसत ) काल रात्रींच मिळालं, पण आज दिवसभर सवड झाली नाही मला—बरं, ते तरुण गृहस्थ कोण होतात तुमचे ?—( आतापर्यंत मार्तंडराव उभेच असतात )—खाली बसाना.

**मार्तंड :** माझा मुलगा आहे तो—( ओशाळल्यासारखे ) थोडा तऱ्हेवाईक आहे !

**डॉक्टर :** ( पाइप पेटवीत ) जन्मतःच असा आहे की कमावलेला आहे त्याचा हा स्वभाव ?

**मार्तंड :** ( यांत प्रश्न कसला, अशा स्वरांत ) जन्मतःच आहे !—म्हणजे माणसाच्या स्वभावांत बदल होऊं शकतो का डॉक्टरसाहेब ?

**डॉक्टर :** होऊं शकतो तर !—बरं, पण हें पाहा, मला तुमच्या या घरांत डॉक्टर म्हणून संबोधूं नका—मी डॉक्टर आहे हें तुमच्या पेशन्टला कळतां कामा नये !—नीट लक्षांत ठेवा.

**मार्तंड :** ( त्यांचा शब्द झेलायला तयार असल्याप्रमाणे मान हालवीत ) बरं बरं, पण असं का म्हणून, डॉक्टरसाहेब ?

**डॉक्टर :** ( चटकन् त्यांच्याकडे नजर रोखून ) झालं—आतांच विसरलांत !

**मार्तंड :** ( थोडें वरमून ) मग काय म्हणूं आपल्याला मी डॉक्टरसाहेब ?

**डॉक्टर :** ( हा प्राणी चांगलाच कठिण आहे हे ओळखून कपाळावर हात मारून घेत ) मला—नुसतं—गुरुजी म्हणा ! कां बी तें विचारूं नका—मी सांगेन ते करा—न चुकता !

**मार्तंड :** ( आता अगदी पटलें अशा मुद्रेने ) ठीक ठीक ! ( चपापून चोरट्या नजरेने त्याच्याकडे पहातात )

**डॉक्टर :** बरं, कसली केस आहे तुमची ?

**मार्तंड :** माझ्या पत्नीची—

**डॉक्टर :** तें कळलंय मला–तुमच्या पत्रांत लिहिलं आहे तुम्ही तें–काय होतंय काय त्याना ?

**मार्तंड :** लग्न झाल्या दिवसापासून वाचाच गेली आहे हो तिची.

**डॉक्टर :** पण मुलगा तर फाडफाड बोलतो !

**मार्तंड :** ( डॉक्टरांचा गैरसमज दूर करण्याच्या आतुरतेने ) नाही नाही, तो तिचा मुलगा नाही !

**डॉक्टर :** म्हणजे दोन बायका आहेत वाटतं तुम्हाला !

**मार्तंड :** छे हो–एकच आहे–द्वितीय संबंध आहे हा माझा.

**डॉक्टर :** असं असं ! लग्नापूर्वी नीट बोलूं शकत होत्या का त्या ?

**मार्तंड :** ( काकुळतीच्या स्वरांत ) अगदी चांगली बोलत होती हो ! चांगली गात असे–कितीतरी बक्षिसं मिळवलीं होतीं तिनं कॉलेजांत असतांना !

**डॉक्टर :** ( आपला युक्तिवाद पटवीत ) म्हणजे पहा ! बदलला ना त्यांचा स्वभाव, लग्नानंतर ?

**मार्तंड :** ( थोडा अचंबा वाटल्यासारखें ) खरंच की ! खरं आहे हं आपण म्हणता तें !

**डॉक्टर :** आणखी काय काय बदल झाला त्यांच्यांत लग्नानंतर ?

**मार्तंड :** थोडी वेड्यासारखीच वागते ती–घरकामांत तर मुळीच लक्ष नसतं तिचं! लहर लागली तर करते एखादे वेळीं, पण जवळजवळ नाहीच—

**डॉक्टर :** अन् लग्नापूर्वी ? लग्नापूर्वी लक्ष रहात असे तिचं, घरकामांत ?

**मार्तंड :** अहो, फार गुणवान होती हो ती! नोकरी करून प्रायव्हेट बी. ए. झाली तरी घरकामांत किती दक्ष होती म्हणून सांगूं! बाप मेल्यानंतर आईचा न् पाठच्या चार बहिणींचा सांभाळ एकटी करत असे ती!–बाप होता शाळा-मास्तर—घरांत अठराविश्वें दारिद्र्य—त्यामुळे त्याच्या पश्चात् मास्तरकी-शिकवण्या करून साऱ्या संसाराचा गाडा एकटी वहात असे—किती गुण सांगू तिचे !

**डॉक्टर :** हल्ली वय काय आहे त्यांचं ?

**मार्तंड :** सव्वीस–सत्तावीस असेल !

**डॉक्टर :** लग्न होऊन किती दिवस झाले ?

**मार्तंड :** येत्या शिमग्यांत तीन वर्षं होतील.

**डॉक्टर :** (तीक्ष्ण नजरेने त्यांच्याकडे पहात) हल्ली तुमचं वय किती ?

**मार्तंड :** गेल्या महिन्यांत त्रेपन्नावं लागलं मला. (खजील होऊन खाली पहातात)

**डॉक्टर :** (मार्तंडरावकडे न पहातां) कां हो, अशी ही सर्वगुणसंपन्न तरुणी तुमच्यासारख्या मध्यमवयीन माणसाशीं लग्न करायला तयार झाली याला कांही विशेष कारण घडलं ? अगदी खरंखरं सांगा हं—माझ्यापासून काही एक लपवून ठेवूं नका !

**मार्तंड :** (डॉक्टरांची सहानुभूति मिळवण्यासाठी रडवा आवाज काढून) मोठी करुणाजनक कहाणी आहे ती!

**डॉक्टर :** (या अभिनयाचा त्यांच्यावर परिणाम होत नाही) कोणाची करुणा ?

**मार्तंड :** माझीच—दुसरं काय ! (स्तब्ध होतात)

**डॉक्टर :** कां, काय झालं ?

**मार्तंड :** माझी पहिली बायको वारल्यानंतर—पांच वर्षं होतील आता त्या गोष्टीला—माझं मन कशांतच रमेनासं झालं—सारं जग कसं भयाण वाटूं लागलं ! त्या वयांत मला कुमारिका मिळणं कठीण—बरं, पुनर्विवाह म्हटला तर तो आमच्या घराण्याच्या संस्कृतीशीं विसंगत—थोडा शेतकरी, जुना थाट आहे आमचा—अशा स्थितींत असतांना हळूंहळूं माझं मन इतकं बसलं या बाईवर—तिच्यासाठी झुरणीलाच लागलों म्हणाना—

**डॉक्टर :** सुंदर आहे वाटतं ही बाई—

**मार्तंड :** नाही, अगदी दहा जणींसारखी आहे ती—पण दाट परिचय होता माझ्याशीं त्या कुटुंबाचा—

**डॉक्टर :** तिचंहि प्रेम होतं तुमच्यावर ?

**मार्तंड :** नाही—तसलं कांहींच नव्हतं ! पण परिचय होता—( चोंहीकडे पाहून जवळपास कोणी आहे की काय याची खात्री करून घेतल्यानंतर ) म्हणूनच—एक दिवस—एक दिवस तिच्याकडे गेलों न् पंचवीस हजारांच्या नोटा तिच्यापुढे टाकल्या न् तिला विनवलं—'हे घे—तुझ्या कुटुंबाचं जन्माचं दारिद्र्य मिटव न् माझाहि संसार सुखाचा कर—

**डॉक्टर :** बरेच श्रीमंत दिसता तुम्ही ! ( मार्तंडराव खाली मान घालतात ) काय म्हणाल्या त्या ?

**मार्तंड :** तिला ही गोष्ट मुळीच रुचली नाही असं वाटलं मला—

**डॉक्टर :** स्पष्ट नकार दिला त्यांनी ?

**मार्तंड :** हो–पण–पण जवळजवळ एक वर्षभर–एका वर्षात तीनचार वेळां तिचीं आर्जवं केलीं–अन् मग काय झालं कुणास ठाऊक, एक दिवस तिचंच पत्र आलं मला–आपल्या आईच्या न् बहिणींच्या कल्याणासाठी तिनं आपल्या मनाची तयारी केल्याचं मला लिहिलं–( पुन्हा एकदा चोंहीकडे चोरटी नजर टाकून )–मात्र हा व्यवहार मी जगांत कोणालाहि सांगणार नाही असं वचनहि तिनं माझ्याकडून घेतलं–नि आमचं लग्न झालं.

**डॉक्टर :** कोणत्या पद्धतीनं झालं लग्न ?

**मार्तंड :** वैदिक पद्धतीनं–इथल्याच विवाहमंडळांत.

**डॉक्टर** : कां, रजिस्टर कां नाही केलंत ?

**मार्तंड** : उगाच गाजावाजा करायचा नव्हता मला–शिवाय आमच्या संस्कृतीशीं रजिस्टर लग्न थोडं विसंगतच वाटलं मला !

**डॉक्टर** : मघापासून दोनदा उल्लेख केलात तुम्ही आपल्या संस्कृतीचा ! मी संस्कृतीवाला गुरुजी नाही, बरं का !

**मार्तंड** : ( थोडें वरमून ) बरं, नाही करणार तो उल्लेख आतां !

**डॉक्टर** : हां !– कांहीच गरज नाही !– संस्कृतीची कल्पना करतां येते मला ! ( मार्तंडराव या गृहस्थाशीं कसें बोलावें याविषयीं बुचकळ्यात पडून स्तब्ध होतात. त्यांच्याकडे न पाहतां ) यस्, गो ऑन ! लग्नानंतर पुढं काय झालं ? त्यांची वाचा गेली ती कोणत्या परिस्थितीत ?

**मार्तंड** : ( निश्वास सोडून ) पुढं त्याच दिवशीं आमची पहिली भेट झाली तेव्हां–ती मला फार उदास असल्यासारखी दिसत होती—तिचं मनच ठिकाणावर नसल्यासारखं दिसत होतं—मी मनाशी म्हटलं थोडंसं हें असं व्हायचंच— ( पुन्हा स्तब्ध होतात ).

**डॉक्टर** : यस् !—पुढं ?

**मार्तंड** : ( खजील होऊन ) मला सांगायला लाज वाटते गुरुजी !

**डॉक्टर** : तुम्हाला सांगायला लाज वाटत असली तरी निसर्ग आहे ना !— निसर्गाला लाज वाटत नसते !—काय केलंत तुम्ही ? स्पष्ट सांगा !

**मार्तंड** : माझ्याकडून थोडा बळजबरीचा प्रकार घडला असंच म्हणाना !

**डॉक्टर** : ( जरा मोठ्याने ) 'प्रकार घडला' ?—म्हणजे इथं कर्ता कोण ? तुम्ही की प्रकार ? ( मार्तंडराव स्तब्ध ) काय झाला त्या प्रकाराचा परिणाम ?

**मार्तंड** : तिनं एक किंचाळीच फोडली ! ( घाबरल्यासारखे घाईने बोलतात ) मला तर कांहींच समजेना !–कितीतरी प्रयत्न केला तिची समजूत घालण्याचा– ( डॉक्टर जोरजोराने खो खो करून हंसायला लागतात )—कां ? ( थांबून ) हंसलांतसे ?

**डॉक्टर** : तुम्हाला कांही समजत नव्हतं तरी तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केलात ! ( पुन्हा हंसत ) यस् ! आणखी काय झालं ? सांगा–

**मार्तंड :** तिला हें विचारलं, तें विचारलं–शेवटी एकदा सहज म्हटलं, 'तुला दिलेल्या रकमेची माहिती तुझ्या आईशिवाय आणखी कोणाला कळली की काय?'–हा प्रश्न विचारतांच तिनं एकदम डोळे काय फिरवले, हातवारे काय करायला लागली, पण एक शब्द बोलेना!–अगदी दांतखिळी बसल्यासारखी करायला लागली–खरं म्हणजे त्या क्षणापासून तिच्या तोंडचा एक शब्द मला ऐकायला मिळाला नाही हो!

**डॉक्टर :** (रोगाचें निदान त्यांना झाल्यासारखें एका झटक्यांत) दॅट्स् इट्!

**मार्तंड :** (डॉक्टरांचा त्यांना एकदम विश्वास वाटूं लागतो, म्हणून मोकळेपणानें) पण खरंच, एक सांगायचं राहिलं हं, तिची वाचा गेली असली तरी तिचा कंठ गेलेला नाही–कारण पुढं ती हळूंहळूं गुणगुणायला लागली–अतिशय गोड आहे तिचा गळा–खरं म्हणजे कांहीतरी गुणगुणत बसणं अन् ही पेटी वाजवणं–माझ्या मुलानं मुद्दाम विकत आणली ही तिच्यासाठी–अन् अधूनमधून कांहीतरी लिहीत बसणं–बस् हा एवढा एकच उद्योग तिचा चाललेला असतो–वेळीं अवेळीं चाललेला असतो–असं आहे हें, गुरुजी!

**डॉक्टर :** (थोड्या स्तब्धतेनंतर) बरं, आणखी कांही होतं का त्यांना?

**मार्तंड :** नाही, आणखी होत असं कांहीच नाही तिला!

**डॉक्टर :** (थोड्या आडून प्रश्न विचारतात) मूलबाळ?

**मार्तंड :** मूलबाळ! आपणसुद्धा तोच प्रश्न विचारलात? अहो मूलबाळ कसं होणार? पांच वर्षं झालीं माझ्या नशिबी स्त्रीसुख नाही! मूलबाळ!

**डॉक्टर :** (या काकुळतीचा परिणाम होत नाही) इतरत्र प्रयत्न केलांत का स्त्रीसुखाचा?

**मार्तंड :** ('मला काय समजतां' अशा स्वरांत) फारसं परवडत नाही तें! बरोबरीचा मुलगा आहे मला!—तिला तपासून पहाना एकदा—माझी कसली फेरतपासणी करता? (थोडा कांगावा करीत) किती उपाय केले आतापर्यंत—किती खर्च झाला—मी तर आता अगदी मेटाकुटीला आलों आहे—कोणाला यश आलं नाही—आपण इथं मानसोपचाराचा नवीनच दवाखाना काढल्याचं नुकतं कळलं म्हणून तसदी दिली आपल्याला—तपासतां का तिला?

**डॉक्टर** : तपासतों—पण तुम्हाला अगोदरच सांगून ठवता—निसर्गाच्या नियमांचं मला जेवढं ज्ञान झालं आहे त्याच्याच आधारावर मी माझे इलाज करून पाहीन-—प्रयोग म्हणून प्रयत्न करीन मी—तुमची तयारी असेल तर !

**मार्तंड** : (दचकून) प्रयोग ? म्हणजे भलतेसलते प्रयोग नाही ना करणार आपण ?

**डॉक्टर** : तुम्ही हा जो प्रीतीचा प्रयोग केलात तसला तरी नक्कीच नाही करणार !

**मार्तंड** : रागावूं नका गुरुजी, आपल्याबद्दल नाही बोलत मी !—पण प्रयोग म्हटला की आता माझ्या छातींत धडकीच भरते !—कारण तिच्यावर आता-पर्यंत अनेकांनी अनेक योजना आंखल्या, प्रयोग केले, मला खर्चात पाडलं — पण तिच्यांत सुधारणा व्हायच्या ऐवजीं उलट जास्तच बिघडली ती !—म्हणून म्हटलं तसलं व्हायला नको आणखी !

**डॉक्टर** : खरंच, हें विचारायचंच राहिलं-कोणी काय काय प्रयोग केले ?

**मार्तंड** : नांवं कशाला सांगूं आता एकेकाचीं ?

**डॉक्टर** : नांवं नका सांगूं-पण प्रयोग कोणते केलेत ते कळलेच पाहिजेत मला !

**मार्तंड** : इथं एक जगप्रसिद्ध योगिराज आले होते-हिच्यासाठी त्यांनी भस्म दिलं-आत्मिक बलाचं भस्म म्हणत त्याला ते-पंचधातूच्या ताइतांत भरून तिच्या गळ्यांत बांधा, म्हणजे आठ दिवसांच्या आंत तिचा गळा अगदी साफ होईल, म्हणाले ते. मी सहज म्हटलं कुठं मिळतो हा असला ताईत-तर त्यांनीच दिला मोठ्या कष्टानं आपल्याच जवळचा एक-अगदी चक्षुर्वैसत्याच्या खात्रीचा !

**डॉक्टर** : त्या सत्याची किंमत किती आकारली योगिराजांनी ?

**मार्तंड** : भस्म फुकट दिलं-पण ताइताचे वीस रुपये घेतले-कां बरं ?

**डॉक्टर** : (हंसून) वाटलंच मला ! अहो ताइताचे मोठे पटाईत व्यापारी होते ते योगिराज ! काय झाला त्या ताइताचा परिणाम ?

**मार्तंड** : काय व्हायचा !-आठ दिवस तर राहोच, आठ मिनिटंसुद्धा राहूं दिला नाही तो तिनं आपल्या गळ्यांत—उलट ताइताबरोबर आपलं मंगळसूत्रहि तोडून फेकलन् तिनं-तेव्हापासून तिचा गळा कसा अभद्र दिसतोय ! कुंकूसुद्धा-लावते

तर हें एवढं मोठ्ठं ! अन् नाही तर आठ आठ दिवस नाही वेणी, नाही फणी, नाही कुंकू–

**डॉक्टर :** तें असूं द्या ! प्रयोग नंबर दोन सांगा आता !

**मार्तंड :** ( चोरट्या नजरेने एकवार त्यांच्याकडे पाहून ) दुसरे एक कविराज आले होते इथं सहज फिरतीवर–कविराज म्हणजे, वैद्य–त्यांनी हिला तपासलं न् म्हणाले की हिला मूलबाळ झालं की सगळं सुरळीत होईल ! मी त्यांना तेंच म्हटलं ' मूलबाळ कसं होणार ? ' त्यासाठी त्यांनी एका मोठ्या बाटलींत श्रृंगाररस नांवाचं औषध दिलं, आणि माझ्यासाठी कांही अनुपान लिहून दिलं एका कागदावर––पण तो कागद तिच्या हातीं कसा पडला कोण जाणे, तिनं तो वाचतांच ती औषधाची बाटली जी भिरकावली माझ्या थोबाडांत––त्यामुळं ह्या इथला दांत इतका दुखावला कीं शेवटी तो उपटून काढावा लागला !

**डॉक्टर :** ( किंचित् हंसून ) दांत उपटायच्या त्या औषधाचं बिल किती झालं ?

**मार्तंड :** काय थट्टा करता गुरुजी !

**डॉक्टर :** थट्टा मी करतों आहे ? आपल्या जीवनाची थट्टा तुम्हीं स्वतः करीत आलात !––एवढ्यावर तरी थांबलात का ?

**मार्तंड :** नाही थांबलों ! ( शरमून ) सगळ्यांत मोठ्ठा प्रयोग राहिला होता माझ्या नशिबी ! इथं एक महाराज आले होते––मोठमोठे मिनिस्टर–गव्हर्नर त्यांचे शिष्य आहेत––म्हणून मीहि दाखवलं त्यांना हिला. ते म्हणाले हा दैवी कोप आहे––रामनामाचा गजर चालू ठेवा घरांत, बकरीचं दूध पाजा तिला, न् घराभोंवतीं पवित्र झाडं लावा––तुळशीचीं, उंबराचीं, अशोकाचीं–– सगळं केलं हो ! ( उसासा सोडून ) सगळं केलं !

**डॉक्टर :** मग काय झालं ?

**मार्तंड :** अति झालं न् गावांतल्या लोकांना हंसूं आलं ! बकरीनं तीं सारीं झाडं खाल्ली न् महाराजांच्या एका शिष्यानं तिच्या या पेटोला एक दिवस कुठं हात लावला––झालं, तिनं त्याच्याच तबल्याची हातोडी जी हाणली त्याच्या टाळक्यावर––बरं करतां ब्रह्महत्याच होत होती––त्या शिष्याचा एक डोळा गमावला––त्याची मूठ दाबतां दाबतां माझं कंबरडं मोडायची पाळी आली !

**डॉक्टर :** बरेच प्रयोग झाले म्हणायचे !

**मार्तंड :** पण या सगळ्या प्रयोगांचा परिणाम असा झाला आहे की आता ती माणूस दिसला की बिथरते! संशयखोर तर इतकी झाली आहे की विचारतां सोय नाही! त्यामुळे तिचे नातेवाईक, माझे नातेवाईक, सगळ्यांनी हें घर वर्ज्य केलं आहे. घरांत स्वयंपाकी ठेवायची सोय नाही, त्यामुळं खाणावळीचा डबा चुकत नाही कपाळचा! मी, माझा मुलगा कुमार, अन् त्याचा एक मित्र आहे तो—एवढे सोडले तर कोणी खपतच नाही तिला! आपल्याला मी इथं बोलावलं खरं, पण आपलं स्वागत ती कसं काय करील काही नेम नाही सांगतां येत !

**डॉक्टर :** (आवाज मोठा करून) माझं स्वागत ती कसं काय करील याची मला मुळीच भीति वाटत नाही—

**मार्तंड :** अहो गुरुजी, हळू बोला-ती बिथरेल बरं !

**डॉक्टर :** (त्याच आवाजांत) असल्या पुष्कळ केसेस पाहिल्या आहेत हो मी-न् दुरुस्तहि केल्या आहेत किती तरी ! ही केस तर फारच सोपी आहे-कारण या विकृतीचं कारण तुम्हीच सांगितलंत मला ! कारण कळल्यावर उपाययोजना करणंहि फारसं कठिण नसतं-पण तुम्ही सांगितलेल्या या साऱ्या इतिहासावरून मला खरी भीति वाटते तुमची ! ही केस ट्रीट करतांना तुमचाच मला फार त्रास होईल !

**मार्तंड :** माझा त्रास ? तो कसा काय ?

**डॉक्टर :** आपल्याला काय हवं आहे हें जसं प्रत्येकाला कळतं तसं तें तुम्हालाहि कळतंय, पण तें प्राप्त करून घेण्याचे जे योग्य मार्ग आहेत ते स्वीकारायला तुम्ही तयार होणार नाही-माझं ठाम मत झालं आहे हे !

**मार्तंड :** (अधीर होऊन मधेंच) कशावरून ?

**डॉक्टर :** तुमच्या संस्कृतीवरून ! मी सांगेन ते पटायचं नाही तुम्हाला !

**मार्तंड :** नाही हो ! तसा नाही मी-आपण सागाल त्याच्या बाहेर नाही जाणार मी !

**डॉक्टर :** (हंसून) काय सांगतां !-तुमची गोष्ट कशाला, पण आपले राज्यकर्ते ? त्यांना तर कोणी अडाणी म्हणणार नाही ? पण त्यांना जें हवं आहे तें

मिळवण्यासाठी आपल्या अधिकारावर योग्य त्या मर्यादा घालण्याचे जसे त्यांच्यावर संस्कार होत नाहीत, तसंच तुमचंहि होईल–तुमचं तर नक्कीच होईल! त्यांना नाही का वाटत, सर्वांनी आपापलीं कामं चोख करावीं, सगळीकडे शांतता असावी, आपल्यावर कोणी टीका करूं नये, सर्वांनी उत्पादन वाढवावं, कोणी संप करूं नये—तसंच तुम्हालाहि वाटतं, तुमच्या बायकोनं तुमच्याशीं गोडगोड गोष्टी कराव्या, पक्वान्नं करावीं, तुम्हाला स्त्रीसुख द्यावं, प्रजोत्पादन करावं, सगळं कांही करावं—पण तुमच्या राज्यांतली ही प्रजा तुमच्या मनासारखी कां वागत नाही याचा, आपला नवरेपणा थोडा बाजूला सारून कधी विचार तरी केला आहेत का तुम्ही? तुमच्या बायकोकडून ह्या चमत्कारिक संपाचा जो 'प्रकार घडला' आहे—आम्ही या असल्या प्रकाराला स्ट्राइक ऑफ दि नर्व्हस् म्हणतो, तुमच्या पत्नीच्या या इथल्या ( जीभ काढून ) मज्जातंतूंनी एक प्रकारचा संप केला असंच समजा तुम्ही—त्या संपाची कारणमीमांसा स्वतःच्या सुखाचा प्रश्न बाजूला सारून आपल्या मनाशीं कधी केली आहे का तुम्ही? काय? अहो कोणीहि झाला तरी संप कां करतो? संपामुळे स्वतःवर अनेक आपत्ती ओढवून तो संप करतो, तो कां? स्वातंत्र्याची इच्छा! गुलामगिरीचा द्वेष! ज्या परिस्थितींत माणसाला नाइलाज म्हणून नको तीं कामं करणं भाग होतं ती गुलामगिरीची असते, हें एकच मूळ कारण प्रत्येक संपामागे असतं, तसंच या बाईचंहि झालं आहे! ती तुमच्या या घरांत नाइलाज म्हणून आली हेंच या चमत्कारिक संपाचं मूळ कारण आहे, समजलात?

**मार्तंड :** ( हा सारा युक्तिवाद त्यांना अगदीच नवीन आहे ) नाइलाज म्हणून इथं आली? मी कुठं जुलुम केला तिच्यावर माझ्या घरीं यायचा? कधी केला?

**डॉक्टर :** कोण कोणावर असला जुलुम करतो हो आजकालच्या काळांत! "तूं रे! तू जन्मभर कारकुनीच कर! तूं! तू मिलहँडच हो! तूं! खर्डे घास जन्मभर! अन् तूं! तूं लोकांचे संडासच झाड! दुसरं कांही एक करतां कामा नये!" असा जुलुम कोणी कोणावर करूं शकत नाही! अन् तरीसुद्धा नको तीं, स्वतःच्या लायकीपेक्षा हलक्या दर्जाचीं, घाणेरडीं कामं करायला कोणी कां म्हणून तयार होतो? आपलं, आपल्या बायकोपोरांचं पोट जाळायला त्याला दुसरा मार्गच नसतो म्हणून तयार होतो! तुमची बायको तुमच्या या नकोशा

घरांत आली ती आपल्या आईचं न् बहिणींचं पोट जाळायला आली—तुम्हीच सांगितलंत मला आत्ता—पण म्हणून हा मार्ग तिनं स्वखुषीनं, अगदी स्वतंत्र माणसासारखा स्वतंत्र विचारानं, हौशीनं पत्करला असा नाही होत त्याचा अर्थ !

**मार्तंड :** अहो, तिनं आपण होऊन पत्र पाठवलं हो मला !

**डॉक्टर :** पत्र ! तिनं अगदी रजिस्टर्ड स्टँप लिहून त्यावर सही केली असती आपल्या हातानीं—पण आपल्या स्वकीयांच्या गरिबीविरुद्ध बंड म्हणूनच केलं असती ! ही बाई बंडखोर आहे ! मुळींच शंका नाही मला ! पण बंड कसं करावं हें माहित नाही तिला, साधलं नाही तिला तें ! ती बंडखोर नसती तर तुमच्या घरीं आल्यानंतर तिनं तुम्हाला घरांत स्त्रीसुख दिलं असतं न् स्वतःच्या पुरुषसुखासाठी बाहेर भटकली असती ! तसं केलं का तिनं ? ( मार्तंडराव नकारार्थी मान हलवतात ) नाही ना ? या बंडखोर बाईला बंड साधेना म्हणून केवळ आपद्धर्म म्हणून, संपाचा हा ' प्रकार घडला ' आहे तिच्याकडून ! समजलात ?

**मार्तंड :** ( विचार करीत ) असं आहे हें ? मग हा संप बंद कसा होईल ?

**डॉक्टर :** दोनपैकी कोणता तरी एक मार्ग स्वीकारला पाहिजे तुम्ही—एक, तुमच्याशीं असलेला तिचा आजचा संबंध कायमचा तोडण्याचा—

**मार्तंड :** ( मधेच तोंड घालून ) छान ! म्हणजे मी मरण्याचा !—हाच की नाही !

**डॉक्टर :** ( त्यांच्याकडे निरखून पाहत ) कां ? तुम्ही कधी मरणारचं नाही वाटतं !

**मार्तंड :** अहो, पण मी मेल्यानंतर त्या दगडाची अगदी सती अहिल्या झाली तरी मला हो काय उपयोग ?

**डॉक्टर :** ( एकदम उमळून ) ' मला ' काय उपयोग ! हाच—हाच तो तुमचा स्वार्थी दृष्टिकोन !—तुमच्या हक्काच्या मूर्ख कल्पना !—ज्या सोडायला तुम्हीं तयार होणार नाहीं म्हणतो ना—ह्याच त्या ! तुम्ही मरायच्या अगोदर तुमच्या बायकोला बोलायला, हंसायला, खेळायला, आनंदानं कामं करायला लावायचं असेल तर ह्या कल्पना ताबडतोब सोडा—हाच तो दुसरा मार्ग ! ( मार्तंडराव स्तब्ध बसलेले असतात, त्यांना हलवून बळकट करण्याच्या

उद्देशाने मुद्दाम डिवचतात ) तुम्ही आपले अधिकार विसरणार नाही ! माझ्या प्रयत्नांत तुमचा नवरेपणा एकसारखा लुडबुड करील, नसत्या अडचणी आणून टाकील, फार त्रास द्याल तुम्ही —

**मार्तंड** : नाही हो ! ( गयावया करीत ) तसं कांही करणार नाही मी !— खरं सांगतों, कसलाच जुलुम करणार नाही मी, सांगाल तस्सा वागेन मी,—

**डॉक्टर** : पहा बरं ! नीट विचार करा ! नाहीतर आता स्वातंत्र्याची घोषणा कराल अन् उद्या आपल्या राज्यकर्त्यासारखे प्रतिबंधक कायदे सांगाल मला !

**मार्तंड** : ( अगदी हातघाईला आल्यासारखे ) नाही, नाही, नाही ! कांही करणार नाही मी तसलं ! शपथ घेऊं का ?

**डॉक्टर** : ( थोडें स्मित करून ) मग नीट ऐका मी काय सांगतों तें—मी निसर्गाच्या नियमांनी वागणारा माणूस आहे ! अन् निसर्गाशीं सत्याचे प्रयोग करायचं म्हटलं की त्याला कधीकधी फार मोठा त्याग करायचीसुद्धा तयारी ठेवावी लागते !— एवढे मोठ्ठे गांधीजी- ज्यांनी आपल्या साऱ्या जीवनालाच सत्याचे प्रयोग म्हटलं— त्यांना देखील फार मोठी फी द्यावी लागली निसर्गाला ! तुम्हालासुद्धा एखाद्या प्रसंगीं तशी फी द्यावी लागेल !

**मार्तंड** : खरंच, हें तर विचारायचंच राहिलं !— आपली फी किती, गुरुजी ?

**डॉक्टर** : ( त्यांचा प्रश्न अनपेक्षित वाटून, गमतीने पण चेहरा गंभीर करून दुसरीकडे पाहत ) ' माझी ' फी ?— माझी फी पंचवीस हजार रुपये !

**मार्तंड** : अरे बापरे ? पंचवीस हजार ?

**डॉक्टर** : तर मग ! —हा रोग घरांत आणायला जेवढी हमाली दिलीत तेवढीच तो बाहेर घालवायला नको द्यायला !

**मार्तंड** : अहो काय थट्टा करताहांत ? खरं सांगाना–माझी ऐपत ती काय—

[ भारती दारांत येऊन उभी होते, भलतीकडेच संथपणें पाहत असते. चोरून ऐकण्याचाच हा वेडसर प्रकार आहे ]

**डॉक्टर** : अगदी अडाणी आहांत तुम्ही ! तुम्ही काय मला सत्याशीं तुमचा सौदा पटवून देणारा कमिशन एजन्ट समजलांत ? दलाल ? — तुम्हाला फी द्यावी लागणार आहे म्हणजे मनुष्यस्वभावाचे जे नियम असतात त्या नियमांपुढे

मान वाकवावी लागणार आहे ! नीट ऐका ! मानवी स्वभावापुढं मान वाकविल्याशिवाय त्याला वाकवूं शकत नाही कोणी ! म्हणूनच सांगतों— मानवी स्वभावाचे नियम मान्य करायला तयार असाल तरच माझ्या नादीं लागा ! नाही तर उद्या मला द्याल शाप ! मला तुमचे शाप नको आहेत उगीचच्या उगीचच !

**मार्तंड** : असं होय ! म्हणजे, म्हणजे कोणते प्रयोग करता आपण, सत्याचे म्हणजे ?

**डॉक्टर** : तें सांगतों मी क्रमाक्रमानं—

**मार्तंड** : बरं बरं ! ( हायसें वाटून ) आपण यश मिळवा गुरुजी, आपला जन्माचा ऋणी होईन मी ! केवढे उपकार होतील माझ्यावर !

**डॉक्टर** : (हंसत हंसत) आणा तर मग त्यांना—

[भारती चटकन् घरांत जाते]

—पण जरा थांबा—मघा तुम्ही म्हणाला होतां की त्यांना कांही तरी लिहीत बसायची संवय आहे-दाखवता का मला त्यांचं लिखाण ?

**मार्तंड** : लिखाण ? तें जरा कठिणच आहे ! कारण ती तें अगदी कडीकुलुपांत बंद करून ठेवत असते-( तिच्या टेबलाचे ड्रॉअर्स ओढून पहातात, ते बंद आहेत, पण ऑर्गनवर एक चिटोरा सापडतो तो उचलून डॉक्टरकडे आणीत ) हा पहा- हा एक चिटोरा सापडला आहे-पहा आपल्या उपयोगी पडला तर-

**डॉक्टर** : ( बारकाईने पहात मोठ्याने वाचतात ) " धनी साप ! धनी मरे ! साप मरे ! गध मरे ! सारे मरे ग भारती "

**मार्तंड** : अहो ते नोटेशन आहे-अन् भारती हें तिचं नांव आहे. कांही लिहिलं की खाली आपली सही करायची संवय आहे तिला !

**डॉक्टर** : ( स्मित करून ) असं होय ! (डोकें खाजवून विचार करीत असतात)

**मार्तंड** : ( बाहेर पावलांचा आवाज होतो तो ऐकून ) कोण आहे ?

[ रसिकलाल प्रवेश करतो ]

**रसिक** : मी रसिकलाल-पुस्तकं न्यायला आलो होतों माझीं-कुमार आला नाही तो खेळायला ?

**मार्तंड :** ( घुटमळत ) मला वाटतं कुमारनं नेलीं आहेत आपल्या खोलींत–आंत आहे तो.

[ रसिकलाल कुमारच्या खोलींत जातो ]

–मग पहातां कां तिला ?

**डॉक्टर :** ( आपल्या तंद्रींतून जागे होऊन ) आं ? ठीक आहे––आणा त्यांना.

**मार्तंड :** छे छे, ती माझ्या म्हणण्यामुळं यायची नाही—माझ्या वाऱ्याला उभी रहात नाही ती !

**डॉक्टर :** ( विचारांतच ) असं होय ? पण मला तर त्यांचं गाणं ऐकायचं होतं, तसंच पेटीवादन ! ( पुन्हा विचार करून ) ठीक आहे, मी बोलावतों त्यांना —मग आता आंत जा तुम्ही—अन् त्या इथं आल्यानंतर हळूंच या !

**मार्तंड :** बरं—

[ मार्तंडराव एक चोरटी नजर घरांत टाकून आपल्या खोलींत जातात. डॉक्टर ऑर्गनसमोर बसून भाता फुंकत वाटेल ते सूर वाजवतात. हें भयानक संगीत ऐकून भारती कपाळावर आंठ्या घालून घाईघाईने प्रवेश करते व डॉक्टरांचे हात धरते. दुसरीकडून कुमार व रसिकलालहि लगबगीने येतात व त्यांच्या पाठीमागे उभे होतात. मार्तंडरावहि हळूंच येऊन त्यांच्या मागे उभे होतात. भारतीच्या हातांत लोंकरीचे गुंडाळे असतात ते ती ट्रेमधे ठेवते व दुसरीकडे पहात उभी होते. ]

**डॉक्टर :** आयॅम् सॉरी ! आपण वाजवता का पेटी ? ( लोंकरीचे गुंडाळे उचलून टेबलाशेजारच्या खुर्चीवर बसतात. तिच्यावर त्यांच्या विनंतीचा कांही परिणाम होत नाही ) वाजवा, वाजवा !

**कुमार :** तिला पेटी वाजवणंच काय, पण गातांसुद्धा येतं ! काय, रसिकलाल ?

**डॉक्टर :** वा वा ! मग तर गाणंहि ऐकलं पाहिजे, ऐकवा ऐकवा !

**कुमार :** (ती स्तब्ध उभी आहे हें पाहून) माई, म्हण ना !

[ भारती चटकन् वळून लोंकरीचे गुंडाळे शोधूं लागते. ते ट्रेमधे नाहीत. ती इकडेतिकडे पहाते. डॉक्टरांच्या हातांत ते तिला दिसतात. डॉक्टरपुढे आपला हात ती करते. डॉक्टर तो धरतात. ती तो झटक्यांत मागे ओढते व दुसरा हात पुढे करते ]

**डॉक्टर** : (ते गुंडाळे तिला देत) आयॅम् सॉरी! घ्या!—

[गुंडाळे हातीं पडतांच ती पूर्ववत् नाकासमोर पहात घरांत जाते]

—(कुमार व रसिकलालला) सिट् डाऊन बॉईज्! बसा, बसा! (रसिकलालचा निर्देश करून) हे कोण?

**मार्तंड** : हे रसिकलाल खरेदीमल—हा माझा मुलगा कुमार—दोघेहि लहानपणापासूनचे अगदा जीवश्चकंठश्च मित्र आहेत—आणखी हे डॉक्टर विश्वंभर, मनासोपचाराचे डॉक्टर—नुकताच त्यांनी आपला दवाखाना काढला आहे इथं—पण यांना गुरुजी म्हणायचं बरं कां आपल्या घरांत—हे डॉक्टर आहेत हे तिला कळूं द्यायचं नाही असं सांगितलं आहे त्यांनी, बर कां!

**डॉक्टर** : काय काय करतात ही मंडळी? (रसिकलालकडे पहातात. तो स्तब्ध)

**कुमार** : हे यंदा एम्. ए. झाले आहेत-लौकरच इंग्लंडला जाणार आहेत!

**डॉक्टर** : (रसिकलालला) काय करणार तिथं जाऊन? (तो विनयाने खाली पहातो)

**कुमार** : डॉक्टरेटसाठी थीसिस लिहिणार आहेत!

**डॉक्टर** : कोणत्या विषयावर? (रसिकलालकडेच पाहतात)

**कुमार** : (भाषण करीत असल्यासारखा अभिनय करीत) क्रायसिस् इन् पोएट्री टुडे! (आवाज उतरवून थट्टेने) आज काव्याला झालेल्या त्रिदोषाचं निदान करणार आहेत ते इंग्लंडला जाऊन!

**डॉक्टर** : (थट्टामस्करींत भाग घेत) यांनासुद्धा बोलतां येत नाही वाटतं! (रसिकलालला हंसूं येतें. कुमार जोराने हंसतो)

**कुमार** : लाजाळूचं झाड आहे हे!

**रसिक** : (सलगीने त्याला दटावीत) आता चुप बसायला काय घेशील?

**कुमार** : म्हणजे संपलंच!—कोण देणार त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरं?

**रसिक** : (जरा धिटावून) हे सुद्धा यंदा एम्. ए. झाले आहेत—आता कायदा शिकताहेत!

**कुमार** : अन् हे! हे काव्याबरोबरच, नाट्याचा, टेनिसचा, गायनाचा, वादनाचा—थोडक्यांत म्हणजे पिढीजात धंदा सोडून बाकीचे सगळे धंदे करताहेत!

**डॉक्टर :** वडिलांचा धंदा कोणता ?

**कुमार :** ( मधेच तोंड घालून ) हां ! कोणी द्यायचं उत्तर ? तूं की मी ? सांग लौकर !

**रसिक :** तूंच सांग आता—

**कुमार :** कां, लाज वाटते वाटतं ! ( डॉक्टरांना ) लोकांनी कोणचे कपडे वापरावे की अजीबातच वापरूं नयेत हें ठरवण्याचा मक्ता घेतला आहे याच्या वडिलांनी ! इन् वन् वर्ड, ही इज् अ मिल–एजन्ट् !

**डॉक्टर :** ( रसिकलालला ) बराच घरोबा दिसतोय तुमचा या कुटुंबाशीं !

**रसिक :** हो, आम्ही दोघेहि एकत्रच शिकत आलों आहोंत लहानपणापासून —यंदाच फाटाफूट झाली आमची पहिल्या प्रथम !

**डॉक्टर :** ( थोडा विचार करून ) हें पहा, माझ्या डोक्यांत एक कल्पना आली आहे आत्ता—तुम्हाला जर गातां येतंय—पेटी वाजवतां येते का ?

**रसिक :** छे हो ! उगीच नाद आहे थोडा, एवढंच ! — येतबीत मुळीच नाही ! — कुमार कांही तरी सांगतो झालं !

**कुमार ;** काय थापा मारतोस, रसिकलाल ! चांगला गातो–वाजवतो बरं हा !

**डॉक्टर :** होय ना ?– तुम्हाला खरंच गातां–वाजवतां येत असेल तर तुमच्या मदतीनं एक प्रयोग करून पहायची कल्पना आली आहे माझ्या डोक्यांत, आत्ताच —

**रसिक :** कसला प्रयोग ?

**डॉक्टर :** तुम्ही भारतीबाईंना काय म्हणतां ?

**रसिक :** काकी म्हणतों !

**डॉक्टर :** तुमच्या मदतीनं तुमच्या काकीला थोडं माणसांत आणतां आलं तर पहावं म्हणतों मी—तुम्ही त्यांना आपल्याबरोबर गायला लावूं शकाल ? —पण अगोदर हें सांगा, इंग्लंडला कधीं जाणार तुम्ही ?

**रसिक :** पासपोर्ट हातीं येतांच जाईन—दोन तीन आठवडे लागतील असं वाटतंय.

**डॉक्टर:** ठीक ! —असं आहे, त्यांना बोलायला लावण्यापूर्वी माझा थोडा घरोबा होणं जरूर आहे त्यांच्याशीं. त्यांना आज संगीताशिवाय दुसऱ्या कोणत्याच गोष्टींत स्वारस्य वाटत नाही, न् मला तर गाणं अजीबात येत नाही—समजतहि नाही—म्हणून तुमच्या मध्यस्तीनं त्यांच्याशीं थोडा स्नेह जडवतां आला तर पहायचं आहे. तेव्हा असं करा, आपल्या बरोबर त्यांना एकदोनदा गायला लावा—

**रसिक :** पण मी म्हणा म्हटल्यानं त्या गायच्या नाहीत, गुरुजी !

**डॉक्टर :** कधी प्रयत्न केला आहे का तुम्ही ?

**रसिक :** छे छे ! फार भीति वाटते मला त्यांची ! अहो, मागे त्यानी एका माणसाच्या डोक्यांत हातोडीच मारली होती ! तेव्हापासून—

**डॉक्टर :** तें कळलंय मला—पण तेवढ्यामुळं भ्यायचं कांही कारण नाही—कांही झालं तरी तुमचा घरोबा आहे—अगदीच परके नाही तुम्ही इथं ! त्या जर तुमच्याबरोबर एकदोनदा गायल्या, माझ्याहि समोर गायल्या तर मलाहि त्यांच्याशीं स्नेह जडवतां येईल ! तेवढं झालं की मी पुढचं सारं पाहून घेईन. मी एकटाच जर त्यांच्याशीं सलगी करायला लागलों तर त्या बिचकण्याचा संभव आहे—आत्ताच पाहिलं मी तें—अन् एकदा जर का त्या माझ्या बाबतींत बिचकल्या तर मात्र माझं काम कायमचं बिनसेल ! ( भारतीविषयी वाटणाऱ्या सहानुभूतीच्या स्वरांत ) आज त्यांचा माणसाशीं संबंधच जवळजवळ तुटल्यासारखा झाला आहे—त्यांची माणुसकी मला अगोदर जागृत करावी लागेल—तेवढ्यापुरतीच मला तुमची मदत हवी आहे—तेवढं झालं की माझं पुढचं काम फार सोपं होईल बघा !—काय ?

**रसिक :** प्रयत्न करून पाहीन मी— आपलं काम तेवढ्यामुळे सोपं होणार असेल तर !— जरूर प्रयत्न करीन !

**डॉक्टर :** शाबास ! भिऊं नका त्यांना ! तुम्ही त्यांच्याविरुद्ध कसली तरी कारवाई करताहात, त्यांना पेंचांत पकडताहात, असा त्यांना संशय येऊं देऊं नका, म्हणजे झालं— अगदी सहज वागत असल्यासारखे त्यांच्याशीं वागा !— हो, पण एक अतिशय महत्त्वाची गोष्ट विसरूं नका— त्यांना बोलतां येत नाही याविषयीं त्यांच्याशीं मुळीच चर्चा करूं नका हं !

**रसिक :** असं आहे कां ? आम्ही तर बोलतों कधीकधी या बाबतींत त्यांच्यासमोर— नाही कारे कुमार ?

**डॉक्टर :** हां !— तसं मुळीच करूं नका हं ! अहो, म्हणून तर मला डॉक्टर म्हणून हाक मारायची बंदी केली आहे मी ! संपावर गेलेल्या माणसाला कामावर परत जाण्याचा कुणी आग्रह करूं लागला, त्या संपाला नांवं ठेवलीं तर तो त्याचा संशय घेतो, द्वेष करतो, तसंच इथंहि आहे !— संपच आहे हा एक प्रकारचा ! दिसीज् अ स्ट्राइक ऑफ हर ओरॅक्युलर नर्व्ह्ज् !— दुसरं असं, की त्यांच्या वागणुकींत जर तुम्हाला थोडासा फरक दिसला तर तो ताबडतोब माझ्या कानावर घाला— मला भेटून ताबडतोब कळवा —माझी वाट पहात बसूं नका ! तसा मी येणारच आहे आता वरचेवर— समजलं ? बरं, हा कागद वाचा बरं— म्हणजे गाऊन दाखवा—

**रसिक :** ( स्वरांत वाचतो ) " धनीसाप, धनीमरे वगैरे "

**डॉक्टर :** काहो, एखाद्या रागाचा प्रकार आहे का ?

**रसिक :** हो–भैरव थाटाचा भास होतो थोडा—

**डॉक्टर :** मग तुम्ही असंच करा–याच आलापांपासून सुरुवात करून पहा– या स्वरांचं त्यांना विशेष आकर्षण असण्याचा संभव आहे.

**रसिक :** हे अशासारखे स्वर त्या नेहमीच गुणगुणतात !

**डॉक्टर :** ( आपल्या मनाशीं बोलत असल्यासारखे ) तेंच !–वाटलंच मला !

**कुमार :** ( थोड्या अश्रद्धेने ) गुरुजी, माईला पुन्हा बोलतां येईल अशी खरंच आशा वाटते आपल्याला ?

**डॉक्टर :** ( पूर्ण आत्मविश्वासाने ) कां नाही ?

**कुमार :** ( तितक्याच अश्रद्धेने ) कां वाटते ?

**डॉक्टर :** जीवनापासून त्या पूर्णपणे पराङ्मुख झालेल्या दिसत नाहीत म्हणून—त्यांची संगीताची आवड शिल्लक आहे म्हणून आशा वाटते ! यंग् मॅन् ! ज्याची प्रकृति जीवनापासून पराङ्मुख झालेली नसते त्याचीच विकृति नाहीशी करणं शक्य असतं ! तुझ्या आईच्या ठिकाणीं कोणताहि एक गुण शिल्लक राहिला असता तर त्यावर मी भिस्त ठेवली असती !—तुला काय वाटतं ?

**कुमार** : माझ्या नुसत्या वाटण्यावर काय अवलंबून आहे! पण आपल्या प्रयत्नामुळे तीं जर खरोखरच बोलूं लागली ना, तर मी आपला शिष्य होईन —कायद्याचा अभ्यास सोडून देईन! तो शिकत असतांनाच त्याच्यावरचा माझा विश्वास उडत चालला आहे!

**डॉक्टर** : हा प्रयोग आपण जर एखाद्या शास्त्रीय-वैज्ञानिक प्रयोगासारखा, मुळीच भावनावश न होतां, कसलीहि अभिलाषा न धरतां—एखाद्या सायंटिफिक् एक्स्पेरिमेंटसारखा केला, तर आपल्याला खात्रीनं यश येईल! (उठतां उठतां) अच्छा तर, जातों मी आतां! वुइश यू ऑल बेस्ट ऑफ लक्! (उभे होतात)

**मार्तंड** : (अदबीने) फार तसदी देतों आहे मी आपल्याला डॉक्टर-गुरुजी!

**डॉक्टर** : (हंसून) नॉटॅटॉल्! नॉटॅटॉल्! अच्छा! गुड नाइट्!

[डॉक्टर आणि त्यांना पोंचवण्यासाठी मार्तंडराव बाहेर जातात. कुमार व रसिकलाल दरवाज्यापासून परततात]

**कुमार** : म्हाताऱ्याचं पाणी चांगलंच खोल दिसतंय हं! अरे मघा ते आले तेव्हा जरा उद्धटासारखाच वागलों मी त्यांच्याशीं!

**रसिक** : काय चुकलं तुझं! तुझ्या नीतिशास्त्राशीं सुसंगतच झालं तें!—काय झालं होतं तुला त्यांच्याशीं तसं वागायला?

**कुमार** : (थोडा घुटमळतो) माझा मूड्च बिघडला होता रे त्या प्रोफेसराची गोष्ट ऐकल्यापासून! हलकट लेकाचा!

**रसिक** : सोड रे नांव त्याचं! भारी हौस तुला एकेकाशीं भांडायची!—

[मार्तंडराव प्रवेश करतात]

—बरं पण कारे, करून पाहूं का या नोटेशनपासून सुरुवात? एखादी हातोडी माझ्या डोक्यांत नाही बसली म्हणजे मिळवली!

**मार्तंड** : अरे बाबा, सभांळून हं! मला अगोदर आत जाऊं दे!

**कुमार** : मी पण जातों हं आपल्या खोलींत!

[मार्तंडराव व कुमार अपापल्या खोलींत जातात. रसिकलाल भीतभीत ऑर्गनसमोर बसून हळूंहळूं त्याच नोटेशनपासून सुरुवात करतो. भारती संथ चालीने हळूंहळूं समोर येते, त्याच्या पाठीशीं

उभी होऊन समोर शून्य दृष्टीने पहात रहाते. नंतर रसिकलाल पुढील चीज गातो ]

**रसिक :** **पतिया रे लिख भेजूं। पियाके पास ॥**
**जारे कगवा कहीयो इतना संदेसवा**
**मोरा ले जैयो ॥ पतिया रे ॥**

[ ही चीज तो गाऊं लागतांच ती ड्रॉवर उघडून कागद काढते आणि टेबलासमोर बसून लिहीत असते. शेवटीं शेवटीं ती उठते, ऑर्गनचा एक स्टॉपर ओढते. ऑर्गनचा आवाज मोठा होतो. सरतेशेवटीं ती आपला स्वर त्याच्या स्वरांत मिसळते. तो स्वर हवेंत विरत असतांना—पडदा ]

●

# २

[ स्थळ पूर्वीचेंच. भारती ऑर्गनसमोर बसली आहे. पूर्वीपेक्षा ती थोडी नीटनेटकी दिसते. नजरेंत किंचित् दृष्टि आली आहे. रसिकलाल समोरच्या बाजूला फेऱ्या घालतो आहे. त्याच्या डोक्यात गोंधळ निर्माण झाल्यासारखा दिसतो. तिच्या चेहऱ्यावर आर्जवाचे भाव दिसतात. तिने आपली नजर त्याच्यावर खिळवून ठेवली आहे. पडदा वर गेल्यानंतर अर्ध्या-एक मिनिटाने ती ऑर्गनचा स्वर लावते व त्याच्याकडे अपेक्षेने पहाते. ]

**रसिक :** नाही–नाही–नाही–नाही ! मी असा गाणार नाही ! अगोदर तुम्ही आलाप घ्या–नंतरच मी गाईन ! ( ती पुढील कवितेची चाल वाजवूं लागते ) अहो, आज तुम्ही हें नवीनच काय आरंभलं आहे ?—आतापर्यंत आपण होऊन निदान आलाप तरी घेत होतां–आज तेहि बंद केलंत ? ( तरी ती पुन्हा तीच चाल वाजवूं लागते )–मी गाणार नाही ! ( एका सोफाचेअरवर बसून तिच्याकडे पाठ करतो. ती वाजवायची थांबते. थोड्या वेळाने ती हळूंच उठून त्याच्याजवळ जाऊन त्याच्या खांद्याला स्पर्श करते. तो एकदां तिच्याकडे दचकल्यासारखा पहातो व नंतर आणखी पाठमोरा होतो. ती त्याचा शर्ट धरून ओढूं लागते. अतिप्रसंग टाळण्याच्या उद्देशाने तो उठतो व तिच्याबरोबर ऑर्गनच्या दिशेने जात असतां ) हा छान डाव उलटवलांत हं तुम्ही माझ्यावर ! — माझीच कविता मला नकोशी करताहांत ( दोघेहि ऑर्गनसमोर बसतात ) अहो, थोडेसे तरी आलाप घ्या तुम्ही आपण होऊन -- ( ती पुन्हा त्या कवितेची चाल

वाजवूं लागते ) मी अगदी पक्कं ठरवलंय, तुम्ही अगोदर आलाप घेतल्याशिवाय मी आता मुळींच गाणार नाही ! ( ती फुगून दुसरीकडे पाहूं लागेत ) अहो, सारे आठ दिवस राहिले आता मला जायला ! ( ती चटकन् त्याच्याकडे वळून त्याचा हात धरते. तिच्या डोळ्यांत आसवें उभीं होतात ) हें असं काय करतां ? ( ती डोळे पुसून पुन्हा कवितेची चाल वाजवूं लागते. तो गहिवरतो ) खरंच ही कविता मला म्हणवत नाही आता ! — आपल्या भावनांचं हें असं प्रदर्शन करणं कसंसंच वाटतं मला ! (ती त्याला आर्जवून ' तूं गा ' अशी खूण करते) काय, नाही ऐकत माझं ? ( ती नकारार्थी मान हालवते ) बरं घ्या ! ( तो उसासा सोडून ऑर्गनवर असलेली त्याची वही उचलून समोर ठेवतो व गाऊं-वाजवूं लागतो. प्रत्येक चरणाच्या शेवटीं ती एक लहानशी मुरकी गुणगुणते. )

**ओंठांतलें गीत गोठलें डोळ्यांत मनांतले बोल अबोल झाले !**
**भागल्या जीवास हवासा विसावा कोठेंहि नसावा—काय हें झालें !**
**आक्रंदतो जीव निर्जीव शब्दांत आविर्भाव भावशून्य होऊनी**
**आसवें विश्वासें ढाळाया ठिकाण विश्वांत दिसेना--जाती आटोनी !**
**जाहला अनर्थ त्यांतल्या अर्थाचा शोध लावण्यांत व्यर्थ धावोनी**
**धावतां धावतां लागलीसे धाप--ठेव तुझ्यापाशीं तुझी कहाणी**
**—हाय रे म्हणत मान टाकोनी**
**देखत्या डोळांहीं प्राण सोडूनी !**

( गायनवादन संपतांच दोघेहि उसासा सोडतात, समोर पहातात, नंतर एकमेकाकडे पाहूं लागतात ) झालं आता तुमच्या मनासारखं ? ( ती आनंद आणि व्यथा यांच्या मिश्रणाचें हसूं हंसत होकारार्थी मान हालवते ) आता आपण होऊन गा — आलाप घ्या ! ( ती पुन्हा शून्यांत पाहूं लागते ) प्रगति करण्याऐवजीं हें काय आरंभलं आहे तुम्ही आज ? ( ती चमत्कारिक नजरेने त्याच्याकडे पाहूं लागते ) परदेशांत जातांना ही आठवण घेऊन जाऊं मी आपल्याबरोबर ? ( ती दुःखावेग आल्यासारखी मान हालवून या कल्पने-बद्दल आपली नापसंती व्यक्त करते. तो दूर होतो, उठतो. -- जणूं काय स्वगत ) खरं म्हणजे माझंच चुकलं ! उगीच दाखविली तुम्हाला मी माझी कविता ! त्यामुळंच झालाय हा भलता प्रकार ! (ती ऑर्गनवर मान टाकून हुंदके

देऊं लागते — तिच्याकडे पाहून ) अहो हें काय हें ? हें रडणं काय न् रुसणं काय ? रडूं नका बुवा ! मला नाही पहावत हें ! काय हें ? ( ती मान वर करते, डोळे पुसते, हुंदके आंतल्या आंत दाबून समोर पाहूं लागते. जड अंतःकरणाने तिच्याजवळ जाऊन ) — तुम्ही आपण होऊन चांगल्या गायला-बोलायला लागलांत तर मला किती आनंद होईल याची कल्पना नाही तुम्हाला ! ( डोळ्यांत साठवीत असल्यासारखी ती त्याच्याकडे पहात असते. ) —गाण्याच्या चढाओढींत लहानपणीं बक्षिसं मिळवलीं होतीं ना तुम्ही ! अं ? ( ती त्याच्या तोंडावर चटकन् हात ठेवते. तो तिचा हात बाजूला सारतो ) काय कारण आहे तुमची ही अशी स्थिति व्हायचं ? ( तिच्या कपाळावर आंठ्या दिसूं लागतात ) बरं जाऊं द्या— नाही काढत हं तो विषय मी ! ( बाहेर डॉक्टरांच्या बुटांचा आवाज होतो. तो चटकन् उठून बाजूला होतो. )

[ डॉक्टर प्रवेश करतात ]

—नमस्कार गुरुजी !

**डॉक्टर :** नमस्कार ! काय भारती ! परवाच्या गाण्यानी आपलं पोट नाही भरलं बुवा ! — आज आपण अगदीं पोटभर गाणं ऐकायचं ठरवून आलों आहोंत !

**रसिक :** ( डॉक्टरकडे न पहातां तिच्याजवळ जाऊन ) नवीनच हट्ट धरला आहे त्यांनी आज ! — मला वाटलं होतं इंग्लंडला जायच्या अगोदर त्या चांगल्या बोलायला लागतील ! ( ती चटकन् उठून टेबलासमोर बसून भिंतीकडे पाहूं लागते )

**डॉक्टर :** (रसिकलाल त्यांच्याकडे पाहूं लागतांच नाकावर बोट ठेवून) अस्सं. म्हणजे तुझा इंग्लंडला जायचा दिवस जवळ आला म्हणून ही घाई झाली वाटतं ! नाही तर ? नाही तर सहा महिन्यांनी ती गायला बोलायला लागली असती तर चाललं असतं तुला, नाही ? कांही जरूर नाही तसं करायची ! भारती तूं आपली भिंतीकडे तोंड करून तशीच बस, हं ! ( ती टेबलावर तोंड झांकून घेते. डॉक्टर रसिकलालला ' कुमारच्या खोलींत जा ' अशी खूण करीत बोलत असतात. त्याला आंतून कडी लावून घ्यायला सांगतात. स्वतः बाहेर जाण्याचें दार आंतून लावून घेतात )

[ रसिकलाल कुमारच्या खोलींत चोरट्या पावलांनी जाऊन दार लावून घेतो ]

—तुला लहर आली म्हणून तिनं बोललंच पाहिजे, गायलंच पाहिजे, बराच अधिकार गाजवायला लागलास!—भारती, मुळींच गाऊं नकोस हं तूं! (ऑर्गनसमोरची वही उचलून उघड्या पानावरचा मजकूर मोठ्याने वाचूं लागतात) कवितेचं नांव "भावार्थ"—कवि रसिक! ओठांतलें गीत गोठलें डोळ्यांत मनांतले बोल अबोल झाले—(पुढील मजकूर मंत्रासारखा पुटपुटतात. शेवटीं पुन्हा मोठ्याने) हाय रे म्हणत मान टाकुनि—(भारती विव्हळल्यासारखी, परंतु डॉक्टरांच्या भावनाशून्य वाचनपद्धतीमुळे अपमानित होऊन त्यांच्याजवळ हळूंहळूं येते. डॉक्टरांच्या हें ध्यानांत येतें, परंतु तिकडे लक्ष न देतां पुन्हा मोठ्याने) हाय रे म्हणत मान टाकुनि देखत्या डोळांहीं प्राण सोडुनी! (ती त्यांच्या हातांतली वही हिसकून घेते व चोंहीकडे पहात घरांत जायला वळते. डॉक्टर तिचा हात धरतात. ती तो सोडवून घ्यायला पहाते पण डॉक्टर आपली मूठ सोडत नाहीत) भारती! बस, अशी इथं बस! (तिला आपल्या शेजारीं कोचावर बसवतात. ती त्यांच्याकडे भेदरल्यासारखी पहाते) पाहूं बरं ती वही! (तिच्या हातांतून वही काढून घेतात व पुन्हां तोच मजकूर आतां थोड्या भावनामय आवाजांत वाचतात) "जाहला अनर्थ त्यांतल्या अर्थाचा शोध लावण्यांत व्यर्थ धावुनी धावतां धावतां लागलीसे धाप ठेव तुझ्यापाशीं तुझी कहाणी—हायरे म्हणत मान टाकुनि देखत्या डोळांहीं प्राण सोडुनी!" कां ग? बरी वाटते कां तुला रसिकलालची ही भावना? (ती कसलीच हालचाल करीत नाही) बरी आहे, नाही? भावना खरंच बरी आहे! (ती किंचित् होकारार्थी मान हालवते. पुढील भाषण करतांना डॉक्टर नाट्यछटेचा उपयोग करतात. मधेंच थांबतात, मधेंच कुजबुजल्यासारखे बोलतात, मधेंच पाइप पेटवतात, सोटा आपटतात, तिचे खांदे धरतात, गदगदा हालवतात—ओरडतात—टांसून बोलतात. या प्रकारांची तिच्या चेहऱ्यावर एकसारखी प्रतिक्रिया होत असते. ती शून्यांत पहाते, तगमग करते, हात चोळते, भेदरते, चडफडते, उसासे सोडते, अश्रू ढाळते)

—पण कां म्हणून बरी वाटावी ही भावना? निराशावादांत माणसाला सुख कां वाटावं? विशेषतः तरुण माणसाला? एका तरुण हतभागिनीच्या जीवनांत घडलेला अनर्थ एका तरुणानं ऐकला, वाचला किंवा प्रत्यक्ष पाहिला—नंतर त्या अनर्थातल्या अर्थाचा शोध लावण्याचा प्रयत्न केला—पण शेवटीं हा प्रयत्न

व्यर्थ आहे असं वाटून जिवाला धाप लागली ! —तरीसुद्धां परार्थासाठी केलेल्या या प्रयत्नाच्या शेवटीं उघड्या डोळ्यांनी प्राण सोडण्याची कल्पना त्या तरुणाला आकर्षक कां वाटावी ?

—म्हाताऱ्याची गोष्ट वेगळी असते ! मरण बरं वाटत नसेल तर तो खरा म्हाताराच नव्हे ! पण तरुणाच्या तोंडीं ही मरणाची भाषा !—एवढी निराशा !

—नो नो नो नो ! शक्य नाही ! मुळींच शक्य नाही !

—शक्य नाही ? मग हा कवि असं कां लिहितो ?—आं ? कां लिहितो ?

—खरंच ! प्रश्न आहे तो, तो लिहितो कां म्हणून ? मरण आवडतंय ना ? मग गुपचुप मरत कां नाही ? मरायचं आहे तर मर अन् मोकळा हो ! कविता कां करतोस ? कोणासाठी लिहितोस ?

—( आर्किमिडीसला 'सांपडल्या' प्रमाणे मोठ्याने ) यूरेका !—सापडलं ! भारती ! उत्तर सापडलं ! मला सापडलें ! मला सापडलें ! अग, माणसाचं एका विशिष्ट प्रकारचं गुरुत्व ! दि स्पेसिफिक ग्रॅव्हिटी ऑफ मॅन् ! हेंच तें उत्तर ! माणूस म्हणजे एकेकटी व्यक्ति नव्हे ! एकेकटा असला तर तो माणूसच रहात नाही ! म्हणूनच तो आपली कहाणी एकट्यापाशीं, स्वतःपाशीं ठेवत नाही ! 'ठेव तुझ्यापाशीं तुझी कहाणी' असं म्हणत असून सुद्धां तो स्वतःपाशीं ठेवत नाही ! ह्याला सांग ! त्याचं डोकं उठव ! त्याला पटव ! अस्सं करतो— समाजाला सांगतो ! साऱ्या समाजाची उठावणी करून आपलं स्वतःचं अफाट सामर्थ्य-स्वतःचं गुरुत्व ठासून सांगत असतो—कविता, कादंबरी, नाटकं, कहाणी, पोवाडे, लिहून सांगतो, गाऊन सांगतो !—खरंच तूं सुद्धां गातेस, नाही कां ? कां गातेस बरं तूं ?—

—कोणीतरी ऐकावं म्हणूनच गातेस ना ?

—तुझ्या गुणगुणण्यांतून, आलापांतून, कांही सांगायचं आहे का तुला ? एखादं गाऱ्हाणं, तक्रार, संदेश, घोषणा, आक्रांत जाहीर करायचा आहे का तुला ? मग तो स्पष्टच कां जाहीर करत नाहीस ?

—अग बोल ! बोल ! शक्य तितक्या मोठ्यानं, अगदीं स्पष्ट शब्दांत बोल ! कोणाला भिऊं नकोस ! कोणाला भितेस तूं ? समाजाला ? अग, आज सारा

समाजच भ्याला आहे! भ्यालेल्यांना भितेस तूं? स्वार्थ साधूं की परार्थ? स्वार्थ की परार्थ?—या द्वंद्वात दुभंगलेल्या लोकांना भितेस तूं? अग, असा आक्रांत करून सोड की सारी स्त्रीजात खडबडून जागी होईल—तिला तिच्या परिस्थितीची जाणीव होईल—आणि एकाच जाणिवेंतून ती एकत्रित होईल!—सारी पुरुषजात हादरून जाईल! त्यांचं डोकं ठिकाणावर येईल!—कां मिटून घेतलं आहेस तूं आपलं तोंड?—कां मिटून घेतलं आहेस?

—तुझी दातखिळी अशी कां बसली आहे, सांगूं? सांगूं? नीट ऐक!

—तूं एका दरिद्री कुटुंबांत जन्माला आलीस! तें दारिद्य तुला हळूंहळूं असह्य होत गेलं! खरं म्हणजे तुझ्या अंगीं कितीतरी गुण आहेत!

—फार गुणवान आहेस तूं! मला माहित आहे--पण त्या गुणांचं चीज म्हणून तुझी त्या दारिद्र्यांतून सुटका होतां दिसेना? आपला समाजच असा झाला आहे! इथं वशिलेबाजी, मनधरण्या, डावपेंच, लांगूलचालन, लाचलुचपत, ढोंग, थापेबाजी-हेच आजच्या समाजांत गुण ठरले आहेत! यांतलं तुला तर कांहीहि नको होतं! कारण फार स्वाभिमानीहि आहेस तूं! एकीकडे तुझा हा असा स्वाभिमान, अन् दुसरीकडे? दुसरीकडे तुझ्या आईचे, बहिणींचे हाल! तेहि तुला दिसत होते, पण बघवत नव्हते! "स्वाभिमान की स्वकीयांना जीवदान?" अशा पेंचांत सापडली होतीस तूं-तडफडत होतीस! नेमक्या याच वेळीं-तुझ्याकडे-एक-धनी आला-तुला म्हणाला "मी सोडवतों तुझ्या स्वकीयांना संकटांतून-पण-पण तूं माझी हो!" तुला तत्काळ वाटलं की हा धनावर बसलेला साप! याला ठेंचूनच कां बळकावूं नको त्याचं धन! त्याच्या संपन्नतेच्या चढेलपणाची तुला चीड आली-त्याविरुद्ध बंड करावंसं वाटलं!—पण-पण तें तुला एकटीला कसं साधणार! तुझ्या अंतरांतलं बंड भोंवतालचा समाज थंड करूं पहात होता!

—हीच तुझ्या कसोटीची वेळ होती! अन् त्याच कसोटींत तूं हरलीस! संपत्तीच्या त्या चढेलपणाविरुद्ध साऱ्या समाजाची एकी करून स्वतःचं सामर्थ्य वाढवण्याऐवजीं, स्वकीयांच्या सुखासाठी तूं स्वाभिमानावर पाणी सोडलंस! तुला न पटणारी गोष्ट केलीस-वेड्यासारखी वागलीस!—आणि वर-वर हा वेडेपणा जगापासूनच नव्हे तर स्वतःपासूनहि लपवण्याचा खोटेपणा केलास! नीट ऐक!

आता आणखी कान बंद करून घेऊं नकोस! तुझी ही बसलेली दांतखिळी, तुझा अमिष्टपणा–सत्यानं तुझ्या असत्याचरणाचा घेतलेला सूड आहे! अगदी निर्दय सूड आहे! तुझ्या कहाणींतलं सत्य तुला सारखं टोचतं आहे!–तुला स्वस्थ बसूं देत नाही! तुझ्या कृत्रिम विवाहाचीं बंधनं तुला तोडायला सांगतं आहे! अग, ही तुझी कहाणी, हें सत्य, साऱ्या जगाला एकदा तरी सांग–एकदा तरी फुटूं दे या सत्याला वाचा! एकदा तरी खरं बोल!—ऊठ!–ओकून टाक तें सत्य एकदा!

—नाही होत हें धैर्य तुला? नाही होत? मग याचा परिणाम काय होईल, सांगूं? सांगूं? जिथं स्वार्थहि नाही, परार्थहि नाही,—ना ऐहिक ना पारमार्थिक —ना स्वाभिमान ना समाधान—अशा अखेरच्या अवस्थेला तूं लौकरच पोचशील— आणि—हाय रे म्हणत, मान टाकून, उघड्या डोळ्यांनी, खरोखरच प्राण... ( भारती जोराने किंचाळते, डॉक्टरांना कवटाळते आणि हंबरडा फोडून रडूं लागते. ते तिची मिठी सोडवूं पहातात ) ऐक! — पुरतं ऐक! —

[ तोंच धाडकन् दरवाजा उघडून रसिकलाल बाहेर येतो ]

**रसिक** : ( भेदरल्यासारखा मोठ्याने ओरडतो ) डॉक्टर साहेब! – आ – गुरुजी! ( भारती चटकन् आपली मिठी सोडून टेबलाशीं जाऊन बसते आणि भिंतीकडे पहात हुंदके आवरूं लागते )

**डॉक्टर** : ( त्यांना रसिकलालचा राग येतो– इतका की त्यांच्या तोंडून निघून जात ) ओ डॅम्! ( पण लगेच सगळा राग गिळून कांहीच झालें नाही असें भासवीत ) कुठं होतास रे तूं इतका वेळ?

**रसिक** : ( गोंधळल्यासारखा ) नाही—म्हणजे कुठं नाही—सहज आपला तिकडे–कुमारच्या खोलींत बसलों होतों —

[ बाहेरच्या दरवाज्यावर थाप वाजते. भारती आपलें तोंड लपवीत त्रस्त झाल्यासारखी घरांत झरझर जाते. रसिकलाल दार उघडतो. मार्तंडराव प्रवेश करतात ]

**मार्तंड** : नमस्कार, गुरुजी!



डॉक्टर :  ......‘हाय रे’ म्हणत—मान टाकून—उघड्या डोळ्यांनी—खरोखरच..

**डॉक्टर :** ( मोठ्याने ) नमस्कार ! मार्तंडराव, मला रसिकलालशीं थोडं आणखी बोलायचं आहे—माफ करा हं !

**मार्तंड :** ठीक आहे-ठीक आहे ! मी आंत जातों—( घुटमळत ) पण हें बघ रसिकलाल, मला भेटल्याशिवाय घरीं जाऊं नकोस, हं—

**रसिक :** बरं—

[ मार्तंडराव आपल्या खोलींत जातात ]

**डॉक्टर :** रसिकलाल, आज तूं फार घोटाळे केलेस ! एक तर तिच्या मुकेपणाचा विषय तूं तिच्यासमोर माझ्याजवळ काढलास—त्यामुळेच कसलीहि पूर्वतयारी न करतां ही केस मला ताबडतोब हातीं घ्यावी लागली ! दुसरी चूक, मला न विचारतां, मी बोलावलं नसतांना एकदम आंत शिरलास—अन् आल्याबरोबर ( थोडें वेडावून ) ‘ डॉक्टरसाहेब ’ म्हणून हाक मारलीस !

**रसिक :** ( खजील होऊन ) खरंच चुकलं हो माझं सारं—पण मी फारच गोंधळलों हो ! त्यांची ती किंकाळी ऐकतांच माझं भानच नाहींसं झालं !—फार घोटाळा झाला का ?—काय करायचं आता ?

**डॉक्टर :** आता—आता मी सांगतों तसं कर ! इतके दिवस फार मदत झाली मला तुझी ! नो डाउट् यू हॅव् बीन व्हेरी हेल्पफुल ! फार आभारी आहे हं त्याबद्दल मी तुझा !—पण, आता यापुढं मात्र मुळींच येऊं नकोस तूं इथं ! ही केस आतां माझ्या ताब्यांत आली आहे—तूं मधेंच आला नसतास तर आजच्या आज मी तिला बोलायला लावलं असतं ! तिच्या मनाचे बांध आज कोसळून पडायला लागले होते—पहिल्याप्रथम—तीन वर्षांनी ! असो ! झालं तें झालं ! पण आतां यापुढं तूं हें काम बंद कर-अन् इंग्लंडला जायच्या तयारीला लाग पाहूं !

**रसिक :** ( थोड्या अश्रद्धेने ) काकी खरंच बोलतील असं वाटतं तुम्हाला आता ?

**डॉक्टर :** मुळींच शंका नाही मला !—पण आतां दोनतीन दिवस विश्रांति द्यावी लागणार आहे तिला—तें कांही असलं तरी तूं मात्र येऊं नकोस हं इथं मुळीच !

**रसिक :** मी न आल्यामुळे त्यांना वाईट तर वाटणार नाही ना ?

**डॉक्टर :** हें पहा, डॉक्टर जेव्हा रोग्यावर चाकू चालवतो तेव्हा सुख नाही वाटत रोग्याला ! पण तोच चालवणं कधी कधी अपरिहार्य होतं ! तरी सुद्धा चाकू चालवणारा डॉक्टर निर्दय ठरत नाही त्यामुळे-समजलास ?

**रसिक :** बरं, कुमार विचारील तर काय सांगूं त्याला ?

**डॉक्टर :** ( ठासून ) मी सांगितलं म्हणून सांग ना ? त्यांत काय आहे ! ( त्याची कवितेची वही त्याच्यापुढे करून ) आणखी — तुझी ही कवितेची वही ( तो एकदम ओशाळून हात पुढे करतो ) ही पण घेऊन जा घरीं—का रे, नर्व्हस झालास वाटतं ? अं ? ( हंसतात ) तुझी ती भावार्थ कविता—चांगली झाली आहे ती ! — पण थोडीशी जास्तच आत्मपर झाली आहे ! ऑल द सेम —कविता चांगली आहे, हं ! बरं तर, मी जातों आता—एक फार सीरियस केस आली आहे माझ्याकडे—गेलं पाहिजे मला. ( उठतात ) पण मी सांगितलेलं विसरूं नकोस हं ! यापुढे तिला सहानुभूति दाखवण्यापेक्षा सहानुभूतीच्या कठोरतेचीच जास्त गरज आहे ! — तें तुला जमायचं नाही ! यू आर टू सॉफ्ट फॉर दॅट् ! अच्छा, थँक्यू हं !—पण खरंच, का रे, इंग्लंडला जायच्या अगोदर भेट ना मला एकदां — चहालाच ये की -- अन् कुमारलाहि घेऊन ये-- आहे कुठं तो उनाड ?

**रसिक :** टेनिस खेळायला गेला आहे.

**डॉक्टर :** ( नेहमीच्या आरामशीर आवाजांत ) मार्तंडराव !

[ मार्तंडराव प्रवेश करतात ]

—अच्छा, जातों मी ! एक अर्जंट सीरियस केस आली आहे— गेलं पाहिजे मला—

**रसिक :** थोडें थांबाना, गुरुजी— वाहन घेऊन येतों एखादं- कुठं जायचंय ?

**डॉक्टर :** अरे, नको नको !— मी पायींच जाईन आपला !

**रसिक :** कां पण ?

**डॉक्टर :** अरे, आजकाल व्यायाम घेतला नाही तर अन्न पचत नाही मुळींच ! ( हंसत ) पण अन्न पचत नाही म्हणून भूक कमी लागते म्हणतोस कां ? हः ! हः ! अरे, निसर्गाचे नियम मोठे हिशेबी असतात ! एखाद्याला त्यानं

मारायचं ठरवलं की अगोदर तो त्याची भूक भडकवून देतो— अन् खाल्लेलं मात्र पचूं देत नाही ! असं कांही झालं की ज्याचं त्यानं ताबडतोब ओळखावं— आपली वेळ आऽली ! मी तर स्वतःसाठी गोवऱ्या सांठवायला सुरुवात केली आहे ! हः हः हः !—अच्छा, गुड नाईट ! ( जातां जातां पुन्हा परतून ) बरं, पण रसिकलाल, चहाला कधीं येतां तुम्ही ?

**रसिक :** कशाला उगीच ही तसदी, गुरुजी ? चहाचं काय एवढं ?

**डॉक्टर :** नो–नो–नो–नो ! तें कांही नाही ! आलंच पाहिजे ! उद्यां–परवां– केव्हा येतोस ?

**रसिक :** ( थोडा विचार करून ) अं– उद्यांच येईन–तीन चारच्या सुमारास– चालेल ना ?

**डॉक्टर :** चालेल चालेल ! अन् त्या कुंभाराला आणायला विसरूं नकोस ! अच्छा, गुड् नाइट् !

**रसिक :** गुड् नाइट् !

**मार्तंड :** नमस्कार !

[ संथ चालीने डुलतडुलत डॉक्टर जातात ]

—( रसिकलालला, जड आवाजांत ) हं, कायरे बाबा--कुठवर आला तुमचा प्रयोग ?

**रसिक :** ( तितक्याच जड अंतःकरणाने ) गुरुजी म्हणताहेत की आज पुष्कळच प्रगति झाली !—मला मात्र कांहीच कळलं नाही त्यांतलं !

**मार्तंड :** आज फार थकल्यासारखा दिसतोस तूं रसिकलाल—फार त्रास होत असेल तुला, नाही ! किती उपकार मानूं मी तुझे !—कोणत्या शब्दांत मानूं मला तर कळतच नाही !

**रसिक :** छे छे छे ! माझे कसले उपकार मानतां, काकाजी !

**मार्तंड :** नाही कसे बाबा ! दुसऱ्यासाठी कोण घेतो इतके श्रम !

**रसिक :** काकी लौकर बोलायला लागोत—कधी बोलायला लागतील असं झालंय मला—

**मार्तंड :** लागेल रे—लागेल ! मलासुद्धा पूर्वीइतकी निराशा नाहा वाटत—निदान तिच्या वागणुकींत तरी बराच फरक झाल्यासारखा दिसतोय मला ! ( चोंहीकडे पाहून ) रसिकलाल, कधीपासून तुझ्याशीं एका प्रश्नासंबंधीं बोलेन बोलेन म्हणतोय—पण धीरच होत नाही !

**रसिक :** ( त्यांना आपला संशय येतो आहे की काय, या विचाराने चपापून ) कसला प्रश्न ?

**मार्तंड :** आमच्या घराशीं तुझा इतका घनिष्ठ संबंध जडला आहे—अन् तुझ्याबद्दल, खरं म्हणशील, तर मला फार भरवसा वाटतो—म्हणूनच वाटतं की एकदा तुला विचारून सोक्षमोक्ष लावून घ्यावा या प्रकरणाचा—विचारूं का ?

**रसिक :** ( जास्तच बुचकळयांत पडून ) विचारा ना—कसला प्रश्न ?

**मार्तंड :** कुमार आहे का रे घरांत ?

**रसिक :** नाही—काय विचारायचंय ? कसली भीति वाटते तुम्हाला एवढी ?

**मार्तंड :** कुमारजवळ बोलूं नकोस हं—मुळीच बोलूं नकोस !

**रसिक :** त्यानीं विचारलं तरी बोलूं नको ?

**मार्तंड :** नको नको !

**रसिक :** त्याच्याशीं भांडण होण्यासारखं आहे की काय कांहा ? एवढा संकोच कसला वाटतोय तुम्हाला ?

**मार्तंड :** ( स्तब्ध होऊन अखेर निश्चय झाल्यासारखे ) आज तुझ्या वडिलांकडे गेलों होतों—तिथूनच परतलोय मी आत्ता—

**रसिक :** कां ? कांही विशेष झालंय की काय ?

**मार्तंड :** तुझ्याजवळ ते माझ्यासंबंधीं कधी बोलतात का रे ?

**रसिक :** क्वचित् चौकशी करतात ते सहज—पण विशेष असं कांहीच बोलत नाहींत ! खरं म्हणजे त्यांचं माझ्याशीं संभाषणच फार थोडं होतं !— माझ्या मोठ्या भावाशीं बोलतात ते पुष्कळ, पण तें त्यांच्या धंद्याविषयी— मी त्यांत कधी लक्ष घालत नाही !

**मार्तंड :** ( अखेरीस धीर करून ) मी तुझ्या वडिलांचं देणं लागतों आहे रे—जवळजवळ एकुणतीस हजार रुपये !

**रसिक :** ( एकदम दचकून ) तीस हजार रुपये !

**मार्तंड :** होय ! मुद्दलाचे पंचवीस हजार अन् त्यावरचं व्याज जवळ जवळ तीन वर्षांचं—

**रसिक :** बाप रे !

**मार्तंड :** तुला हें ठाऊक नाही मुळींच ? कुमार कधी बोलला नाही ?

**रसिक :** छे छे ! मुळींच नाही ! तुम्हाला ठाऊकच आहे त्याचा स्वभाव ! एखादी गोष्ट नाही बोलायची म्हटली तर प्राण गेला तरी तोंड उघडायचा नाही तो !

**मार्तंड :** हं !—तुम्ही आजकालचीं मुलं—

**रसिक :** म्हणजे माझं म्हणणं असं की दुसऱ्यासाठी प्राण द्यायला सुद्धा कमी नाही करायचा तो— वेळ आली तर— असा आहे तो !

**मार्तंड :** ( निश्वास सोडून ) लागली लहर तर देणार— नाही तर घेणार ! पण त्याची लहर केव्हा कशी लागेल याचा नेमच नसतो !

**रसिक :** तसं नाही बरं, काकाजी ! त्याचीं मतं मुळींच लहरी नाहीत ! पण एवढं मात्र खरं हं की त्याचा पारा एकदा वर चढायला लागला म्हणजे किती चढेल याचा नेमच सांगतां येत नाही !

**मार्तंड :** म्हणूनच म्हणतों बाबा, यातलं कांही सांगूं नकोस त्याला !

**रसिक :** पण—पण हें एवढं थोरलं कर्ज—कशासाठीं काढलं होतं तुम्ही ?

**मार्तंड :** लाज वाटते रे सांगायला ! ( थोड्या स्तब्धतेनंतर ) मी कुमारच्या आईला या रकमेनं विकत घेतली— कर्ज काढून ! ( त्याच्याकडे एकदा पाहून तोंड झांकून घेतात. दोघेहि स्तब्ध रहातात )

**रसिक :** ( बऱ्याच मनस्तापानंतर ) पण काकी, काकी कशा काय तयार झाल्या या असल्या व्यवहाराला ?

**मार्तंड :** आपल्या आईबहिणींच्या कल्याणासाठी ! रसिकलाल, गरिबी म्हणजे मोठी वाईट आपत्ति असते बाबा ! मोठमोठ्यांचा विवेक नष्ट होतो तिच्यापुढे ! तुला अनुभव नाही तिचा !

**रसिक :** प्रत्यक्ष अनुभव नसला तरी गरिबांना हल्ली आपल्या परिस्थितीमुळं काय वाटत असतं तें अगदीं स्पष्ट दिसायला लागलं आहे हं आता ! अहो फार कशाला, एखाद्याला नुसतं वरचेवर मोटारींत हिंडतांना त्यांनी पाहिलं ना, तरी त्यांचे डोळे कसे मत्सरानं अगदीं पेटल्यासारखे दिसतात ! हें ध्यानांत आल्या-पासून आजकाल मी तर होतां होईल तों सायकलवरच हिंडतोंफिरतों !

**मार्तंड :** छे छे ! रसिकलाल, गरिबीमुळं स्वतःची विक्री करावयाचा प्रसंग येणं —तें जावें त्याच्या वंशा तेव्हाच कळें ! बोबडी वळेल तुझी तुझ्यावर तसा प्रसंग आला तर !

**रसिक :** ( एकदम लख्ख प्रकाश पडल्यासारखा डोळे ताणून ) म्हणजे ! म्हणजे काकींची वाचा बंद होण्याचं हें कारण आहे ? डॉक्टरसाहेबांना माहित आहे ही गोष्ट ?

**मार्तंड :** नाही, ही कर्जाची भानगड माहित नाही त्यांना—कोणत्या तोंडानं सांगूं ? थुंकतील ते माझ्यावर !

**रसिक :** पण अशानं त्यांना अंधारांत ठेवण्यासारखं नाही का होणार ? त्यांच्या प्रयोगाची दिशा नक्कीच चुकत असेल अशामुळं ?

**मार्तंड :** ही कर्जाची लाजिरवाणी गोष्ट सांगायचा मला धीरच होत नाही ! त्यांना सांगितलं तर ते म्हणतील तिला तिच्या घरीं परत पाठवा—पैसे परत घेऊन या न् कर्ज फेडून टाका ! त्यांचा युक्तिवाद सोपा का असतो !

**रसिक :** बरं पण विचारणार काय होता तुम्ही ?—तें राहिलंच !

**मार्तंड :** तूं आपल्या वडलांना गळ घालूं शकतोस माझ्या वतीनं ? — माझ्या जिवांत जीव आहे तोपर्यंत या घराचं गहाण करून देण्याचा किंवा दिवाणी दाव्याचा हट्ट सोडायला तयार आहेत का ते—विचारशील त्यांना ? मी दुसरी प्रॉमिसरी नोट करून द्यायला तयार आहे— पण ते नाही म्हणतात. तूं विचारूं शकतील त्यांना ?

**रसिक :** दगडाला पाझर फोडण्याइतकंच कठिण आहे हें काकाजी ! (सुस्कारा) तरी पण विचारून पाहीन—जरूर विचारीन.

**मार्तंड :** कधी विचारशील ? तूं इंग्लंडला जायच्या आधी झालं पाहिजे हें काम !

**रसिक** : आजच विचारतों—

**मार्तंड** : उद्यां येऊन सांगशील मला? फार उपकार होतील बघ माझ्यावर तुझे!

**रसिक** : असलें कांही बोलूं नका काकाजी! मला कसंसंच वाटतं!—बरं पण काकाजी, यापेक्षा तुम्ही आपली थोडी इस्टेट विकून कां नाही हें कर्ज फेडून टाकत?

**मार्तंड** : जमीनदाऱ्या न् मालगुजाऱ्या नष्ट होण्याच्या या दिवसांत कोण घेतो आता आमच्या इस्टेटी! शिवाय कुमारच्या संमतीशिवाय कोणताच व्यवहार करतां येत नाही मला! तो हें घर विकायला-गहाण ठेवायला तयार नाही! (रडकुंडीला येऊन) शेटजींनी दावा केला तर जी गोष्ट लपवायचा मी इतके दिवस प्रयत्न केला ती चव्हाट्यावर येऊन माझ्या तोंडाला काळं लागेल रे!

**रसिक** : (कुमारविषयी थोडा विरोध मनांत उत्पन्न झाल्यासारखा) पण निदान तुम्हाला ऋणमुक्त करण्यासाठीसुद्धा संमति द्यायला तयार नाही कुमार?

**मार्तंड** : माझं ऋण! माझं पाप आहे हें रसिकलाल! माझ्या पापाचा भागीदार व्हायला तयार नाही तो! एका परीनं त्याचंहि म्हणणं खरंच आहे—नाही का?

**रसिक** : मोठा कठिण फांस आहे हो हा! (उठून फेऱ्या घालूं लागतो)

**मार्तंड** : हें बघ रसिकलाल, तुझ्या जिवाला कसलाहि त्रास करून घेऊं नकोस हं! (रसिकलाल आपली वही ऑर्गनवर ठेऊन उभ्याउभ्या एका पायाने भाता दाबत बोटांचा चाळा करतो) तुला संकटांत घालायचा हेतु नाही बरं माझा! (भारती घरांतल्या दरवाजासमोर उभी होते, तिला पाहून) हें बघ, मी जरा बाहेर मोकळ्या हवेंत फिरून येतों थोडा! (रसिकलाल ऑर्गनसमोर बसून आपलें तोंड झांकून घेतो)

[ मार्तंडराव आपल्या खोलींत जातात व लगेच टोपी व काठी घेऊन येतात व बाहेर जातात. भारती प्रवेश करते. ]

**रसिक** : (भारती हळूंच त्याच्या शेजारीं येऊन उभी होते व त्याच्याकडे काळजी करीत असल्यासारखी पहात रहाते. नंतर ऑर्गनवरची वही उचलते

तेव्हा त्याला तिचा धक्का लागतो. त्याबरोबर दचकून ) अरे ! ( तो पुन्हा आपलें तोंड झाकून घेतो. ती त्याच्या शेजारीं बसते व त्याचें डोकें धरून त्याची मान वर करते. तो तिच्याकडे चमत्कारिक नजरेने पहातो व कवितेची वही तिच्या हातून काढूं लागतो. पण ती हट्टाने ती वही ड्रॉवरमध्ये ठेऊं लागते. हें पाहून गांहिवरून ) द्या ती मला ! ( ती पाठमोरी असते व नकारार्थी मान हालवते ) तुमच्यासाठी नव्हत्या लिहिल्या मी त्या–खरंच सांगतों ! ( तरीहि ती नकार दर्शवते )—नुसते शब्द आहेत ते–कांही किंमत नाही त्याची ! आपल्याजवळ नका ठेवूं तुम्ही ते–माझ्या खळबळलेल्या मनःस्थितीचा प्रवाह आहे तो–आपलं प्रतिबिंब त्यांत नका पाहूं तुम्ही–तुमचं विस्कटलेलं जीवन आणखी विद्रूप होऊन जाईल ! ( ती त्याच्याकडे तोंड फिरवून आवेशाने नकार दर्शवते व तोंड झाकून घेऊन हुंदके देऊं लागते. उठून उभा होत ) अरेरे ! काय ही अवस्था !–मुक्या जनावराच्या, मेलेल्या कातड्याच्या आधारावर, चांगल्या धडधाकट माणसानं आपल्या मनाची तार बसवून मंजुळ स्वरांत रंगवायची —अन् त्या मेलेल्या कातड्यानं ?—मुकंच रहायचं ! स्‌ ! ( तिच्याजवळ जाऊन तिचे खांदे धरून तिला गदगदा हालवतो — मोठ्याने ) बोल ! मुक्या जिवा ! एक तरी शब्द बोल ! कोणत्या बंधनांनी तुझी वाचा जखडून ठेवली आहे — तोड तीं सारीं बंधनं ! — गा ! एकदा तरी आपल्या मुक्तकंठानं गा ! ( निर्जीव झाल्यासारखी ती आपली मान त्याच्या हातावर टेकते. तो तिच्याकडे पहात उभा होतो—नंतर हलकेंच आपला हात काढून घेतो व पुन्हा थोडा दूर होतो. ती भारावलेल्या मनस्थितींत ड्रॉवरमधून दुसरीच एक वही बाहेर काढते आणि ऑर्गनसमोर बसून पानें उलटूं लागते. एक पान उघडून त्याकडे पहाते. तो तिच्या शेजारीं बसतो आणि वहीकडे आश्चर्याने पहातो. ती हलक्या हाताने पुढील कवितेची चाल वाजवूं लागते ) — तुम्ही लिहिली आहे ही कविता ? ( ती कोणतेंच उत्तर दर्शवीत नाही, पण एक हुंदका दाबल्यासारखें करते ) गा ! आपल्या श्रमांचं सार्थक होईल — त्याच क्षणाची वाट पहात आहोंत ना आपण केव्हांचे ! ( ती वाजवत असते ) ऐकूं द्या मला ! वाटेल ते ओवाळून टाकीन तुमच्या एका शब्दावरून ! ( ती त्याच्याकडे आर्जवपूर्वक पाहूं लागते ) काय ? नाही बोलतां येत ? अरेरे ! ( ती त्याला 'तूं गा ना' अशी खूण करते ) काय ? मी गाऊं ? बरं, बरं, गातो हं ! ( तिने सुचवलेल्या

चालीवर तो गाऊं लागतो. शेवटचा चरण संपतां संपतां तिच्या तोंडून अस्पष्ट-पणें, परंतु स्वरात, 'सफल हें मीलन' हे शब्द बाहेर पडतात. मधून मधून ती आपल्या गळ्याची साथ करीत असते. परंतु हे शब्द तिच्या तोंडून ऐकतांच रसिकलाल आनंदाने बेहोष झाल्यासारखा होतो )

**होउं दे सफल हें मीलन**
**दोन जिवांचे भेद–भयाचे संशयतट लंघुन ॥ होउं दे ॥**
**सुकलेल्या कलिका मूककथा सांगती**
**मिटलेल्या नेत्रीं वाट तुझी पाहती**
**उमलव रे त्या तव प्रीतीचे दंवबिंदू शिंपुन ॥ होउं दे ॥**
**निर्झरिणी अगतिक झुरझुरुनी आटल्या**
**पेटल्या दिशांवर कृष्णकळा लोटल्या**
**उकलव रे ही नीरवता तव प्रतिभेने भंगुन ॥ होउं दे ॥**
**आभाळ कोसळो चोंहिकडुनि धडधडा**
**पडला तरि पडूं दे झडुनि कळ्यांचा सडा**
**दवडुं नको रे काळ तयांची माळ पहा गुंफुन ॥ होउं दे ॥**
**पाकळया कळयांच्या बहरुनिया उमलतां**
**ओंवतां उभयतां दोहिकडुनि संपतां**
**उजळवुं फुलवाती अंतरिच्या गांठ मनीं बांधुन ॥ होउं दे ॥**

[ शेवटचा चरण तो गात असतां कुमार प्रवेश करतो. त्याच्या हातांत रॅकेट आहे. स्तब्ध उभा होऊन तो ऐकत असतो. भारतीच्या तोंडचे 'सफल हें मीलन' हे शब्द कानीं पडतांच तो भारल्यासारखा होतो. ]

**कुमार :** ( गायन संपतांच जोराने उडी मारून ) ब्रॅव्हो ! काँग्रॅच्युलेशन्स ! ( त्याचा आवाज ऐकतांच भारती चटकन् उठून आपली वही ड्रॉवरमध्ये बंद करते. तो रसिकलालला एकदम कवटाळतो ) किती अभिनंदन करूं रे रसिकलाल तुझं ! ( भारतीकडे वळून ) माई ! कोणत्या शब्दांत— ( भावनांनी भारावलेल्या तिच्या चेहऱ्याकडे पाहून )—पण हें काय हें ? तुझे डोळे हे असे पाण्यानं कां भरून आले आहेत ? ( रसिकलालला ) का रे मास्तरा ! रागावला बिगावलास काय रे तिला ?

**रसिक :** ( गंभीर आवाजांत ) कुमार !—

**कुमार :** ( त्याचें तोंड आपल्याकडे वळवून ) काय झालं रे तुलासुद्धा हें असं रडवं तोंड करायला ? ( दोघांकडे पहातो )

**रसिक :** ( गंभीर आवाजांत ) कुमार, तुला अंतःकरण कधी येईल रे ? ( तोहि गंभीर होऊन रसिकलालच्या शेजारीं बसतो व आळीपाळीने दोघांकडे पहातो ) अव्यक्त ब्रह्माला पहिल्याप्रथम अभिव्यक्ति कशी प्राप्त झाली ? ईश्वराच्या रहस्याचा पहिला स्फोट कसा झाला ? शब्दांतून ! त्याला कितीतरी वर्षं—अनंत वर्षं कोंडल्याकोंडल्यासारखं झालं होतं ! अशाच परिस्थितींत एक दिवस त्या निःशब्द अवस्थेंतून शब्दोच्चार झाला—प्रणवाची—ओंकाराची गर्जना झाली ! त्या गर्जनेनंतर ईश्वरानं संकल्प केला—आणि त्याच्या संकल्पांतून पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश अशा पंच-महाभूतांची उत्पत्ति होऊन निराकार ब्रह्म साकार झालं ! कुमार, आत्ताचा हा सुद्धा पहिल्या शब्दाचा स्फोट आहे आणि ही शातता स्फोटानंतरची गंभीर शांतता आहे !

**कुमार :** रसिकलाल ! खरंच, तूं अगदी रोमारोमांत कवि आहेस ! आहे की नाही, माई ? ( तिच्या निर्विकार चेहऱ्याकडे पाहून ) हें काय माई, आता तूं बोलत कां नाहीस ? बोल ना ग—कधीचा वाट पहातो आहे मी, तूं माझ्याशीं एकदां तरी बोलशील म्हणून ! ( उठून उभा होतो. तिला हालवून ) बोल ना ! ( रसिकलालहि उठून दूर होतो ) काय, नाही बोलत ? ( तिचा चेहरा निर्विकार असतो )

**रसिक :** ( पूर्वींच्याच गंभीर विचारांच्या तंद्रींत असल्यासारखा ) तुला काय वाटतं, पंचमहाभूतं निर्माण झाली न् लगेच सारी सृष्टि—अगदी आजची अर्वाचीन सृष्टि— तिथल्या तिथं त्याच क्षणीं आकारास आली ? आपल्याला थोडा धीर धरावा लागेल, कुमार !

**कुमार :** ( गंभीर होऊन रसिकलालकडे वळत ) खरं आहे ! पण केवढी पॉवर— केवढं सामर्थ्य असतं रे शब्दांत ! माई, तुझ्या तोंडचा शब्द ऐकतांच माझ्या साऱ्या शरिरांत असा कांही संचार झाला बघ ! कोणाची होती रे ती कविता ?

**रसिक :** मला माहित नाही रे !

**कुमार :** कोणाची आहे ती माई? पाहूं दे मला! (ती निश्वास सोडते)

**रसिक :** मोडक्या बाजारातले ग्रंथ उसकटून पहातां पहातां मला सापडली ती वही!

**कुमार :** (त्याचा मूळ स्वभाव जागृत होऊं लागतो) थापा मारूं नकोस रसिकलाल!—तुझीच असेल ती!

**रसिक :** शपथपूर्वक सांगतों, कुमार, माझी नाही ती! (भारती ऑर्गनसमोर जाऊन बसते)

**कुमार :** अरे, कोणाचीहि का असेना!—गुड् इज् गुड्—ॲन्ड ऑल् इज् वेल् दॅट् एन्ड्स् वेल! (त्याला एक नवीनच कल्पना सुचते त्याबरोबर टाळी वाजवून) अरे—माझ्या डोक्यांत एक ग्रॅंड् आयडिया आली आहे बघ! (घाई झाल्यासारखा) अरे तूं इंग्लंडला जायच्या अगोदर आपण एक खूप ग्रॅंड् पार्टी करूं!—आपण म्हणजे तूंच!—आपल्या बापाजवळ कुठं आहेत पैसे! एक पार्टी करायची हं—अन् तुमच्या दोघांच्या गाण्याचा जलसा करायचा—(कुमारचें म्हणणें ऐकत असतां भारतीचा चेहरा हळूंहळूं काळवंडूं लागतो व शेवटच्या वाक्यावर ती एकदम 'आय्' करून ऑर्गनवर मान टाकते. त्याबरोबर दचकून) अरे, काय झालं रे! माई! (तिला हालवतो. रसिकलालहि जवळ येतो.)

**रसिक :** अरे आज फार थकल्या आहेत रे त्या!

**कुमार :** (तिला पुन्हा हालवून) माई! काय होतंय तुला हें असं? का रे, पाणी आणूं का रे?

**रसिक :** आण आण, जा!—

[ कुमार धावतच घरांत जातो ]

—(तिच्याकडे वांकून पहात गंहिवरून) काय होतंय हें असं? अं? (भारती त्याचा हात घट्ट धरून आपल्या हृदयाशीं लावते व गंहिवरून ती अश्रुमोचन करूं लागते—)

[ —पडदा— ]

●

# ३

[ स्थळ पूर्वीचेंच. पडदा वर जातो त्या वेळीं मार्तंडराव समोरच्या कोचावर तोंड झांकून बसले असतात. दिवाणखान्यांत संध्याकाळची छाया पसरलेली असते. ते आत्महत्येच्या विचारांत आहेत. थोड्या वेळाने ते निश्चय ठरल्यासारखे उठतात, सारे दरवाजे आंतून लावून घेतात, दिवा लावतात. कपाटाखालून एक चापट पेटी बाहेर काढतात व समोर आणून कोचापुढे ठेवतात. तिचें झाकण उघडतात तेव्हा बरीचशी धूळ खाली सांडते. आंतून एक डबल बॅरलची बंदूक बाहेर काढतात. कांही क्षण तिच्याकडे भेदरलेल्या नजरेने पाहतात. नंतर काडतुसांच्या डबींतून एक काडतूस बाहेर काढतात व तें बंदुकींत भरतात. त्यांच्या हातापायांना कंप सुटूं लागतो. पुन्हा तोंड झाकून घेतात, इतक्यांत दरवाज्यावर टक्टक् आवाज होतो. ]

**मार्तंड** : ( दचकून आपल्याच मनाशीं ) कोण आहे ? ( लगेच तें सारें सामान कसेबसें घाईघाईने कोचाखाली लपवून ठेवतात आणि दरवाजा उघडतात. )

[ डॉक्टर प्रवेश करतात. ]

**डॉक्टर** : ( नेहमीच्या आरामशीर व मोठ्या आवाजांत ) नमस्कार ! ( मार्तंडराव तोंड फिरवून नुसतेच हात उचलून कसाबसा नमस्कार करतात ) हं, कसं काय ? काय हालहवाल आहे आमच्या पेशन्टची ? त्या दिवसापासून

चार दिवस सवडच झाली नाही मला इकडे यायला! (मार्तंडराव एखाद्या गुन्हेगारासारखे समोरच्या कोचावर येऊन बसतात आणि खाली पहात रहातात) का हो, कांही विशेष कांही झालंय? (मार्तंडरावकडे खाली वाकून पहात) का हो, बोलत कां नाही?

**मार्तंड :** (सारा मनस्ताप गिळून टाकण्याच्या प्रयत्नांत ओंठ चावून गुरगुरतात) कोणाजवळ बोलूं?

**डॉक्टर :** (थोड्या सहानुभूतीच्या स्वरांत) कां बरं, मी आहे ना? माझ्याजवळ बोला!

**मार्तंड :** काय करूं तुमच्याजवळ बोलून? ही आग—माझ्या घराला लागलेली, चोंहीकडून पेटलेली हो आग—(श्वास आंत ओढून तो गिळल्यासारखा करतात)

**डॉक्टर :** आग? कोणी लावली आग? (मार्तंडराव बोलत नाहीत. एकदम संशय आल्यासारखे) रसिकलाल कुठं आहे? माझ्या घरीं आला नाही तो चहाला—(मार्तंडराव स्तब्ध) मी गेल्यापासून इंथ आला होता तो पुन्हा?

**मार्तंड :** (सारा मनस्ताप ओकून टाकायला अवसर मिळाल्यासारखे) हो आला होता! (आवाज चढवीत) माझ्या कुळांत विटाळ कालवायला—तेवढ्यापुरता—दुसऱ्याच दिवशीं आला होता!—(डॉक्टर विचारमग्न होऊन झरझर फेऱ्या घालूं लागतात) काय करूं—काय करूं? हें तुफान!—कसं जाईल हें?—कसं जाईल?

**डॉक्टर :** (सहानुभूतिपूर्वक, थोडे स्वतःशीं थोडे मार्तंडरावांना उद्देशून) तुफान! सगळीं तुफानं डिप्रेशनमुळे निर्माण होत असतात—एकीकडचं डिप्रेशन दुसरीकडच्या इन्फ्लेशनमुळं होतं—हें असंच आहे—निसर्गाचे नियमच आहेत हे —

**मार्तंड :** (वेड्यासारखे त्यांच्याकडे डोळे फिरवून) कसलं बोडख्याचं इन्फ्लेशन!—(चिडून) तुम्हाला थट्टा सुचते आहे या वेळीं?

**डॉक्टर :** (तरीहि सहानुभूतिपूर्वकच) खरं आहे तुमचं म्हणणं! माणसाच्या बोडख्यांत इन्फ्लेशन झालं म्हणजेच कधीकधी छातींत डिप्रेशन येतं त्याच्या—

अन् मग डोकं बेताल-बेफाम होणं त्याचं !--तुमचीहि तीच अवस्था झालेली दिसते आहे !—तिलाच तुम्ही तुफान म्हणताहांत—होय ना ?

**मार्तंड** : ( वेड्यासारखे हातवारे करीत ) हां, हां, हां, हां ! तसंच झालंय—समजलं हं आता ! ( अंगाची तलखी होत असल्यासारखे शर्टाने वारा घेत ) स् ! स !

**डॉक्टर** : मग आता ? पुढं काय ? पुढचा प्रश्न—

**मार्तंड** : ( पिसाळल्यासारखे किंचाळतात ) प्रश्न ? तुमच्यासारख्या दगडाला कसले आले आहेत प्रश्न ?—मला नाही विचारायचे तुम्हाला प्रश्नबिश्न ! —घरीं जा आपल्या ! मी पाहून घेईन माझं !

**डॉक्टर** : ( कांही क्षण विचार करीत त्यांच्याकडे निरखून पाहिल्यानंतर दरडावून ) पण मला विचारायचे आहेत कांही प्रश्न तुम्हाला— भारती त्या खोलींत असेल नाही का ? ( त्याबरोबर घरांतल्या दरवाज्यावर जोरजोराने थापा वाजतात ) दार उघडा !

**मार्तंड** : ( तितक्या निश्चयाने ) नाही उघडत ! मला नाही पहायचं तिचं काळं तोंड !

**डॉक्टर** : पण मला पाहिलंच पाहिजे ( स्वतः जाऊन दार उघडतात )—

[ भारती प्रवेश करते. मार्तंडराव उठून आपल्या खोलींत जाऊं पहातात ]

—बसा तिथं !— आता कां घाबरगुंडी उडाली ?

**मार्तंड** : ( जोराने कोचावर जाऊन धाडकन् आदळून ) घ्या ! ( दांत ओठ खात, थरथर कांपत समोर पहात बसतात. भारतीच्या अंगांत अगदीच नव्या चैतन्याचा संचार झाल्यासारखा दिसतो. तिचें पातळ-पोलकें नीटनेटकें आहे. चेहऱ्यावर बेफिकिरी आहे. केंसांत एकदोन फुलें खोंवलीं आहेत. प्रवेश करतांच ती ऑर्गनसमोर बसून जलद लयीचे स्वर वाजवते—मधूनमधून ताना घेते )

**डाॅक्टर** : ( तिच्याकडे पहात तिच्याशेजारीं टेबलाला टेंकून उभे असतात. दोन तीन मिनिटें तिचें हें गायनवादन चाललें असतें. नंतर ती सगळ्यांत वरचा स्वर लावून धाडकन् तें बंद करते. तिला हलकेंच ) कोणता राग झाला हा ?

( ती दोनतीन सेकंद शून्यांत पाहते. नंतर दांत विचकून खिक्‌कन्‌ एकदां हसते आणि भ्रमिष्टासारखी पुन्हा शून्यांत पाहूं लागते. तिच्यापासून दूर होऊन, निश्वास सोडून, स्वतःशींच विचार करीत असल्यासारखे ) समजलं ! तुमच्या तुफानाचं कारण आलं आता माझ्या ध्यानांत ! तुमच्यासारख्या माणसाचं असं होणं अगदीं नैसर्गिक आहे ! पण आता मला एकच गोष्ट सांगा— कशासाठी आला होता तो गाढव इथं ?— त्या दिवसानंतर आपण होऊन आला होता रसिकलाल इथं ?— त्याला येऊं नकोस म्हणून सांगितलं असताना आला होता ?– ( मार्तंडराव कोणच्याच प्रश्नाचं उत्तर देत नाहीत ) कांहो, बोलत कां नाही ?— कसला तरी कट केला आहे की काय तुम्ही दोघांनी माझ्याविरुद्ध ? ( तरीहि ते स्तब्धच. एकदम आवाज उतरवून नंतर हळूंहळूं चढवीत ) मरा तर मग !— भोगा तुमच्या कर्मांचीं फळं !— स्त्रीजातीला निर्बल समजतां नाही का तुम्ही ! त्याच अबलेनं पुरुषाचा साधलेला दावा आहे हा दावा ! तुमच्या रानटी संस्कृतीला पेटवणारा दावानल आहे हा, समजलात !— स्त्रीजातीला तुमच्या चैनीची, उपभोगाची एक चैतन्यशून्य मालमत्ता समजून— केवळ उपभोगासाठी म्हणून तुम्ही तिच्यांत शिल्लक ठेवलेल्या एकमेव शक्तीनं— तिच्या स्त्रीत्वानंच घेतलेला हा रानटी सूड आहे ! ( थोड्या स्तब्धतेनंतर ) हाच— हाच तो निसर्गाला फी देण्याचा प्रसंग ! अजून सांगतों—हें जें झालंय तें मानवी स्वभावाचा नैसर्गिक आविष्कार समजून त्याच्यापुढं आपलं डोकं वाकवाल तर अजूनसुद्धा तुमची या तुफानांतून सुटका होईल—तुमच्या सुटकेचा मार्ग तुम्हाला दिसेल ! अन्‌ नाही, तर—

**मार्तंड** : ( एकदम खवळून ) तुम्ही—तुम्हीच कारण आहांत या साऱ्या प्रकाराला—तुमचे सत्याचे प्रयोग बाधले हे मला !

**डॉक्टर** : ( तितक्याच जोराने ) बंद करा तुमची वटवट !—माझे सत्याचे प्रयोग बाधले काय तुम्हाला ?—अन्‌ तुमचे ?—पैशाच्या झाडावर प्रेमाचं कलम लावायचे अडाणी उद्योग पिढ्यान्‌पिढ्या—शतकानुशतकं—तुम्ही करत आलात ते ! ते कोणाला बाधतील ? मला ? हः ! माझ्यावर कशाला चडफडताहांत हा फटकारा बसल्याबरोबर ! पहिल्या दिवशीं सांगितलं होतं मी तुम्हाला—सत्याचे प्रयोग करणारानं अगोदर आपली छाती नीट मोजून पहावी—उगीच फुगवून मोजूं नये ती ! अन्‌ एकदा त्या प्रयोगांत हात घातल्यानंतर आपलं तळपट

झालं तरी तळतळाटाचा एक शब्द उच्चारूं नये!—सत्यावर कांही परिणाम होत नाही तळतळाटाचा!—पहिल्या दिवशीं सांगितलं होतं मी तुम्हाला! (उद्वेगाने) कां म्हणून माझी सगळी खटपट मातींत मिळवलीत तुम्ही?—

**मार्तंड :** सांगितलं होतंन, महाराज-सांगितलं होतंन! (भारतीचा निर्देश करून) आपल्या घरीं घेऊन जा ना तो तुमचा सत्याचा दाखला! सुटेन मी एकदाचा! माझ्या शक्तीबाहेर आहे हो हा तुमचा प्रयोग!

[ रसिकलाल प्रवेश करतो. त्याच्या हातांत ब्रीफ केस आहे. त्याच्या चालीवरून तो दारू प्याला असावा असा संशय येतो. डॉक्टर-मार्तंडराव-भारती यांना पाहून तो थबकतो, परंतु लगेच उसने अवसान आणून समोर येतो ]

**रसिक :** (जड जिभेने) काकाजी! (भारती चटकन् उभी होते व त्याच्याकडे टक लावून पाहूं लागते)

**मार्तंड :** (दांतओठ खात त्याच्या अंगावर चाल करून जाण्यासाठी उठतात) चालता हो इथून-चांडाळ!—

**डॉक्टर** (आपला सोटा आपटून) मार्तंडराव!—चुप बसता की नाही!

**रसिक :** (त्याच्या अंगावर रेलल्याबरोबर ते दोघेहि खाली कोसळतात) माझं थोडं ऐका तर-थोडं ऐका!

**मार्तंड :** वरून मलाच चुप बसायला सांगतां!

**डॉक्टर :** (रसिकलालल्याहि दरडावून) रसिकलाल! नीट बस पाहूं!—मार्तंडराव, अगोदर नीट ऐका त्याला काय सांगायचं आहे ते! अन् त्याला काय शिक्षा करायची ती मग ठरवूं! (दोघीहि चुप बसतात. भारती कावरी-बावरी होऊन डॉक्टरकडे पाहूं लागते) हं, काय आहे रसिकलाल! काय सांगायच आहे तुला?

**रसिक :** (डॉक्टराचा हा नूर पाहून, कबुलीजबाब देण्यास तयार झालेल्या गुन्हेगारासारखा) मला शिक्षा! (ब्रीफकेसमधून एक जाड पाकीट काढून डॉक्टराच्या पुढे करून) ही घ्या शिक्षा! (डॉक्टर ते पाकिट तपासून पहात

असतात—त्यांच्याकडे खालच्या मानेने पहात) लौकर उघडा—लौकर उघडा, डॉक्टरसाहेब—ओ, आयॅम् सॉरी—गुरुजी!

**डॉक्टर :** आता गुरुजी बिरुजी म्हणायची कांही गरज नाही!

**रसिक :** (तत्परतेने अनुमोदन देत असल्यासारखा) बरं, बरं!—नाही म्हणणार! गुरुजी नो मोअर!

**डॉक्टर :** (पाकिटांतल्या हिरव्या नोटांचे भेंडोळें पाहून) अरे बापरे! ही एवढी रक्कम कसली, रसिकलाल? आं? कुठून आणलीस ही?

**रसिक :** (जड जिभेने शब्द उच्चारीत) माझ्या बापाच्या–त्या मांगाच्या–त्याच्या त्या ऋणातून मुक्त करण्यासाठी–(थवकतो)

**डॉक्टर :** (चपापून) कसलं ऋण?

**रसिक :** (मान हालवीत) सांगून टाका, काकाजी–सांगून टाका! (उठून उभा होतो)

**डॉक्टर :** (तो निघून जाईल या कल्पनेने) चाललास कुठं?

**रसिक :** (तो खरोखरच जाण्याच्या विचारांत होता—म्हणूनच घुटमळून) छे छे! जात नाही मी—थोडी तहान लागली आहे मला—अरे देवा!

**डॉक्टर :** तहान लागली आहे तर तिकडे कुठं चाललास? (तो थबकतो)

[ भारती झरझर पावलं टाकीत घरात जाते ]

—बस तिथं! (रसिकलाल खाली बसतो)

[ भारती पाण्याचा पेला घेऊन प्रवेश करते ]

**मार्तंड :** (तिच्या हातातला ग्लास पाहून जोराने) लाज नाही वाटत—(भारती दचकते, तिच्या हातून पेला गळून पडतो व पाणी खाली सांडतें)

**डॉक्टर :** मार्तंडराव! खाली बसा! (मार्तंडराव पुन्हा दांतओठ खात बसतात)

**रसिक :** आ:!

[ भारती पेला घेऊन घरांत जाते ]

(खाली सांडलेले पाणी बोटांनी टिपून डोळयाना लावून बाहेर जायला वळतो) आत्ता येतो हं—

**डॉक्टर** : पुन्हा बाहेर चाललास !

**रसिक** : अहो जात नाही मी कुठं !— ( खिसे चाचपत ) बाहेर मोटारींत किल्ली राहिली आहे ती आणतों !—जात नाही मी—सगळं सांगायलाच आलों आहे मी इथं—आत्ता येतों !

**डॉक्टर** : खरं ना हें ?

**रसिक** : अगदी खरं— आलों, एका मिनिटांत आलों—

[ रसिकलाल जड पावलांनी बाहेर जातो ]

**डॉक्टर** : कसले पैसे आहेत हे ?

**मार्तंड** : ( कांगाव करीत ) मला नाही माहित !

**डॉक्टर** : त्याच्या बापाचं कसलं ऋण ?

**मार्तंड** : मला माहित नाही म्हटलं ना ! कां छळताहांत उगीच ?

[ भारती पुन्हा पेला भरून पाणी आणते. चोंहीकडे पहाते, नंतर पेला ऑर्गनवर ठेवून खुर्चीवर बसते आणि ' धनीसाप— ' हे स्वर गुणगुणूं लागते. दीड-एक मिनिट ती अशी गुणगुणत असतांना कुमार रसिकलालला आपल्या खांद्याचा आधार देऊन आंत आणतो. त्याच्या हातांत रॅकेट आहे. कुमार बोलूं लागतांच भारती स्तब्ध होते आणि पुढील संवाद लक्षपूर्वक ऐकत बसते. तिच्या चेहऱ्यावरील आविर्भाव सारखे बदलत असतात. ]

**कुमार** : भर सडकेवर मोटारींत बसून दारू पिताना तुला भीति नाही वाटली ?

**रसिक** : ( रडक्या आवाजांत ) भीति वाटूं नये म्हणूनच प्यालों रे !

**कुमार** : प्यायला कधीपासून शिकलास ? खाली बस !

**रसिक** : आजच पहिल्यांदा प्यालों रे !

**कुमार** : अन् गेले तीन-चार दिवस कुठं गेला होतास ?

**रसिक** : मुंबईला गेलों होतों—

**कुमार** : मुंबईला ? आतापासून ?

**रसिक** : मला इथं रहायची भीति वाटायला लागली होती रे !

**कुमार** : ( कोडें पडल्यासारखा ) भीति ! कसली भीति ? ( रसिकलाल हुंदके देऊं लागतो ) चुप ! रडूं नकोस !—रॅकेट घालीन डोक्यांत ! ( भारती एकदम दचकून पहाते. रसिकलाल हुंदका आवरतो ) हं चल सांग—कसली भीति वाटायला लागली होती तुला ?

**रसिक** : गुरुजी !—नाही, नाही–डॉक्टसाहेब ! तुम्ही माझ्याजवळ बसा ना ! मला भीति वाटते हो याची !

**डॉक्टर** : ( रसिकलालजवळ जाऊन बसतात ) कुमार, जरा बेतानं ! — हं – सांग – अगदी न भितां सांग बरं ! कसली भीति वाटायला लागली होती तुला ? –– हे पैसे कसले—सगळं सांग बरं —

**कुमार** : ( आश्चर्यचकित होऊन ) पैसे ? कसले पैसे ? ( डॉक्टर त्याला पाकिट देतात. त्यांतली ती नोटांची चळत पाहून ) म्हणजे !

**रसिक** : इंग्लंडला जायची तयारी करण्यासाठी म्हणून मुंबईला गेलों होतों––

**कुमार** : खोटं बोलूं नकोस ! इंग्लंडची तयारी करायला गेला होतास तर मग मला न सांगतां कां गेलास ?

**रसिक** : ( एकदम रडूं लागतो ) कुमार !

**कुमार** : लागलास पुन्हा रडायला !

**रसिक** : रडूं नको तर काय करूं कुमार ! कोणत्या तोंडानं सांगूं मी माझं पाप रे !—डॉक्टरसाहेब, माणसाच्या हातून देव पाप कां घडवतो हो ? — अरेरे ! मला नाही सांगतां येत माझं पाप— मी दुबळा ठरलो हो !—देवा रे !

**कुमार** : ( एकदम त्याचा गळा धरून ओरडतो ) पाप !! कसलं पाप !—

**डॉक्टर** : (त्याच्याहिपेक्षा मोठ्याने ओरडत त्याचा हात दूर लोटून) कुमार ! ( कुमार आपलें मस्तक घट्ट धरून फेऱ्या घालूं लागतो ) डोकं शाबूत ठेव आपलं ! ( रसिकलालला ) हे पैसे कसले ? कुणाचं कर्ज ?

**रसिक** : ( भेदरल्यासारखा ) सांगूं का काकाजी ?

**मार्तंड** : खबरदार एक अक्षर बोलशील—

**कुमार** : शट अप् !

**डॉक्टर** : काय हें कुमार ?

**मार्तंड :** माझा जीव घ्या ना तुम्ही सगळे मिळून—

**कुमार :** ( सारा प्रकार असह्य होत असल्यामुळे अधीर होऊन ) हं काय रे बाबा ! ही रक्कम कसली — सगळं सांगून टाक ना एकदाचं ! धिस् इज् बिकमिंग इनटॉलरेबल् !

**रसिक :** डॉक्टरसाहेब ! — काकाजींनी कर्ज घेतलं होतं माझ्या वडिलां-जवळून — ( मार्तंडराव उठून जायला लागतात )

**डॉक्टर :** चाललात कुठं ?

**मार्तंड :** जातोय ? पहातो ना हा सगळा तमाशा ! ( ऑर्गनच्या मागल्या बाजूस असलेल्या तख्तपोसावर धाडकन पालथे पडतात )

**डॉक्टर :** (रसिकलालला) मार्तंडरावांनी कर्ज घेतलं होतं तुझ्या वडिलांजवळून ?

**रसिक :** होय ! माझे वडील त्याची परतफेड करायचा तगादा लावत होते काकाजींपाशीं—नाही तर दावा करणार होते— म्हणून त्यांच्याजवळ रदबदली करायला सांगितलं होतं त्यांनी मला—

**डॉक्टर :** कसलं कर्ज, कुमार ?

**कुमार :** ( दांतओठ खात ) त्याच्या ह्या काकोबांनी कर्ज काढलं होतं त्याच्या बापाचं—माझ्यासाठी आई खरेदी करायला !—पंचवीस हजार रुपये ! ( भारती एकदम किंचाळते. कुमार चटकन् तिच्याजवळ जाऊन तिला थोपटून धीर देत ) माई-माई, घरात चल ना तूं ! ( ती आपला विरोध दर्शवते )

**डॉक्टर :** शी शी शी शी !—काय माणसं आहांत रे तुम्ही ! अन् कशाच्या भरवशावर दिलं त्या बनियानं हे एवढं थोरलं कर्ज ?

**कुमार :** लढाईच्या काळातला—काळ्या बाजारांतला पैसा आहे हा डाक्टरसाहेब ! ज्याला तो पचवतां आला नाही त्याच्या ओकाऱ्या आहेत ह्या ! ओकारीची घाई झाली म्हणजे स्थलकालाचा का विचार करूं शकतो कुणी !—हलकट साले ! यांना फासावर लटकवायला कधी मिळेल असं झालंय मला !—हं, आता शेवटचं सांग रे ! त्या कर्जाचा अन् या रकमेचा काय संबंध ?—बोल लौकर !

**रसिक :** माझ्या वडिलांचं मन मी वळवूं शकलो नाही—न् म्हणून

डॉक्टरसाहेब !—तुम्ही माझ्या तोंडावर थुंका हवं तर—पण माझ्या पापाचं प्रायश्चित्त म्हणून—मी माझा इंग्लंडला जाण्याचा बेत रद्द केला ! माझ्या वडिलांनी माझ्या नांवावर बँकेंत ठेवलेला पैसा काढून आणला ! काकाजी, ते घ्या न् त्या सागाच्या ऋणातून कायमचे मुक्त व्हा—

**मार्तंड :** ( एकदम उसळून ) हां !—आणि तुला त्या परा। जारकर्म करायला कायमची मोकळीक करून द्या !—( पुन्हा तक्तपोसावर पाल्थे पडतात )

**रसिक :** नाही हो—

**डॉक्टर :** अजून तरी चुप बसतां की नाही ! तुमच्या संस्कृतीची आली तेवढी शोभा पुरेशी नाही झाली अजून !—अहो, तुम्ही तरी पंचवीस हजार रुपयाचा दुसऱ्या कोणत्या सत्कार्यासाठी उपयोग केलात ! शेण खाणाऱ्याच्या संस्कृतीला शेणाचंच प्रायश्चित्त मिळावं !—कुठं चुकलं !

**रसिक :** ( रडव्या स्वरात ) डॉक्टरसाहेब ! मला सहन होत नाही हो हें ! काकाजींना खरंच ऋणमुक्त होऊं द्या—मी नाही येणार या घरांत पुन्हा माझं हे काळं तोंड घेऊन—जाऊं द्या मला ! ( उठून उभा होतो भारती ऑर्गनवर मान टाकून हुंदके देऊं लागते )

**कुमार :** ( रसिकलालला खाली दाबून ) कुठं जाऊं द्या ?—अन् कां म्हणून तुझ्या बापाच्या ऋणातून मुक्त व्हा ? कसलं ऋण रे त्याचं ? आं ? ज्या लक्षावधि दरिद्र्यांनी तुझ्या बापाच्या मिलमधले युनिफॉर्म चढवून रणांगणावर आपले जीव दिले, जे लंगडे झाले, लुळे झाले, आंधळे झाले, अन् तुझ्या बापानं मात्र लाखो रुपयांचा नफा कमावला—त्याचं ऋण कोण फेडील ?—फेडणार आहे का तुजा बाप ? त्याला सांग, कर म्हणावं तुझे सगळे दावे अन् फिर्यादी माझ्यावर ! असल्या कसायाच्या सुऱ्याचा धाक मला नको दाखवूंस ! सुऱ्याबद्दल कसायाला नुकसानभरपाई ! भांडवलदाराला नुकसानभरपाई देऊन—म्हणजे त्याचं भांडवल वाढवून—भांडवलशाही नष्ट करूं पहाणारा तुझ्यासारखा खुळचट कवि नाही मी ! ( त्याच्या ब्रीफकेसमधे नोटांचें पाकीट कोंबून ती त्याच्या हातात देत ) हे घे ! अन् ठरल्या दिवशीं उडत जा विलायतेला—तुझ्या काव्याचं मरण पेटवायला ! जा नीघ ! ( भारतीकडे वळून पहातो. तिचा

एकदम कळवळा येऊन तिच्या पाठीवर आपली मान टाकून ) माई ! काय ग ही तुझ्या जिवाची विटंबना ! ( हुंदके देऊं लागतो )

[ भारती उठते आणि त्याच्या खांद्याचा आधार घेऊन हळूंहळूं घरांत जाते ]

**डाक्टर** : ( दहा–बारा सेकंदांच्या स्तब्धतेनंतर निश्वास सोडून ) रसिकलाल ! तूं एक सरळ मनाचा पण भुरळ पडणारा कवि ठरलास ! तुला काव्याच्या क्रायसिसवर प्रबंध लिहायचा आहे, नाही का ? तुला एक लहानशी सूचना देऊं ? हें बघ, निसर्गाच्या ज्ञात स्वरूपावर आपली निर्भय दृष्टि भिडवून, त्याच्या पायाशीं बसून, अतिशय विनयानं, विश्वासानं कवि जोंपर्यंत त्याच्या अज्ञात शक्तीचा, साऱ्या मानवजातीच्या कल्याणासाठीं धावा करत असतो, तोंपर्यंत त्याच्या मुखातून जिवंत काव्याचा प्रवाह आपोआप वहात असतो ! — तोच निसर्गाला भिऊन, त्याच्याकडे आपली पाठ फिरवून, केवळ स्वतःच्या वैयक्तिक बचावासाठी जेव्हा तो सैरावैरा पळत सुटतो तेव्हाच त्याच्या काव्यात क्रायसिस निर्माण होतो ! अरे, कवि झाला म्हणून काय झालं ! त्याचं कल्याण साऱ्या मानवजातीच्या कल्याणासाठी धडपडल्याशिवाय कसं साधेल त्याला ? अन् साऱ्या मानवजातीचं कल्याण मानवी ऐक्याशिवाय कसं साधेल ? निसर्गाशीं भिडून, झटून, झगडण्यासाठी मानवजातीला जागृत करायचं असेल तर कवीनं आपल्या वैयक्तिक जीवनांत निरंकुश राहून चालत नाही ! असल्या कवीच्या हाकेला कोणीहि ओ देत नाही ! कवि व्हायला छातींत संयमाचा दम असावा लागतो, बाबा ! ( निश्वास सोडतात )

[ कुमार संथ चालीने घरांतून प्रवेश करतो ]

—कायरे बाबा, भारती काय म्हणते ?

**कुमार** : ( जड आवाजांत ) स्वस्थ पडली आहे ती— वादळांत सापडलेल्या एखाद्या खिळखिळया खोपटासारखी कोलमडून पडली आहे ! ( उसासा सोडून ) काय झालं हे सारं, डॉक्टरसाहेब ?

**डॉक्टर** : ( आपला पराभव नम्र भावाने मान्य करीत ) काय झालं ! माझा पराभव झाला–– आणखी काय ! हे असंच होत असतं रे ! एखाद्या माणसांतले दोष आपण आपल्या वैयक्तिक सामर्थ्याच्या बळावर घालवण्याचे प्रयत्न करतों

—आपल्या हें ध्यानांतच रहात नाही की आजच्या माणसाचा पिंड गेल्या शेंकडों पिढ्यांच्या सस्कारांनी, रूढींनी, तसाच आजच्या आचारा-विचारांनी कितीतरी बडवलेला- घडवलेला- वेढलेला असतो! आणि म्हणूनच त्याच्या आत्म्याला स्पर्श करून जागृत करायला गेलों की या भक्कम संस्कारांच्या, आचारा-विचारांच्या भिताडांवरच आपण आदळतों— तिथंच आदळत रहातों! हीं भिंताडं पाडणं एकट्या-दुकट्याचं का काम आहे! मी तर थकलों आहे रे आता! पण तुम्हीं तरुण आहांत— तुमच्या सबंध पिढीची शक्ति अन् बुद्धि एकवटून खर्ची पडेल तेव्हाच भारतीसारख्या कोट्यावधी अबलांचं बळहि पुरुषजातीला उपकारक होईल! अरे, कोणीहि एकटं जगूं नये, एकटं धडपडूं नये, एकटं लढूं नये, एकटं मरूं नये! मरतां मरतां डोकं टेकायला चैतन्याच्या मांडीचा आधार मिळाला तर माझ्यासारख्या मरायला टेकलेल्या म्हाताऱ्यालासुद्धा जीवनाच्या सातत्याचा भरंवसा वाटतो! तुकारामानं देवाजवळ एकट्यापुरती मुक्ति नाही मागितली—सत्संग मागितला! माणसाची मुक्ति सत्संगांत आहे रे! ओ गॉड्! ( थकव्याचा निश्वास सोडतात. आठ-दहा सेकंद सगळेच स्तब्ध असतात. नंतर सोट्याचा आधार घेऊन ते उठतात ) कुमार, रसिकलाल, जातों मी आता! ( मागल्या बाजूस तख्तपोसावर पडलेल्या मार्तंडरावांना उद्देशून ) मार्तंडराव, आयॅम् व्हेरी सॉरी!—विस्तवाशीं खेळ करून पहाण्याची प्रवृत्ति प्रत्येक माणसांत असते—स्वभावतःच असते—त्या प्रवृत्तींत कसली अनीतीहि नाही—पण विस्तवाचे नियम पाळावे—नाही तर आपले हात तर भाजतातच, पण दुसऱ्यांनाहि त्याची झळ लागते —अनीतीचा प्रारंभ तिथूनच होतो! जाऊं द्या! झालं तें झालं! अनुभवानं शहाणे व्हा-- नुसते शोक करत बसूं नका! ( मार्तंडरावकडे वळून ) -- कुमारसारखा मुलगा आहे तुम्हाला — भाग्यवान् समजा तुम्ही स्वतःला! — जातों आता मी- उद्यां येईन पुन्हा! ( कुमारकडे पहातात ).

**कुमार** : रसिकलाल, त्यांना तुझ्या गाडींत पोंचव बरं घरीं —

**डॉक्टर** : ( थोड्या विचारानंतर ) कुमार, तूंहि चल बरं थोडा माझ्या बरोबर — एक दोन मिनिटं काम आहे तुझ्याशीं—

**कुमार** : कसलं काम ?

**डॉक्टर :** ( नाकावर बोट ठेवून ' मार्तंडरावासमोर नको ' अशी खूण करून). अगोदर चल तर थोडा—

[ सहानुभूतीची एक नजर मार्तंडरावावर टाकून डॉक्टर आणि त्यांच्या मागोमाग कुमार व रसिकलाल जड पावलांनी जातात. ते जातांच मार्तंडराव ताडकन् उठून बाहेर जाण्याचा दरवाजा लावून घेतात आणि समोर येऊन कोचाखालची बंदुकीची पेटी बाहेर ओढतात. पेटी उघडून त्यांतील बंदूक बाहेर काढतात. ]

**मार्तंड :** ( बंदुकीकडे पहात प्रथम खोल आवाजांत आणि नंतर हळूहळू तो चढवत, स्वगत ) उद्या पुन्हा येईन ! पुन्हा ? कशाला ? तुमचीं व्याख्यानं झोडायला ? चोर्हीकडून ठेचल्यानंतर आणखी वरून तुमच्या माकडचेष्टा करायला ? तुम्ही वाजवलेलं माझं दिवाळं–या घरांत माजवलेला भ्रष्टाचार–तुम्ही सगळ्यांनी मिळून मातींत मिळवलेली माझी अब्रू–माझ्याच घरांत–माझ्या डोळ्यादेखत तुम्ही केलेला माझा अपमान–मी सहन करूं ? शोक करूं नको ?–अनुभवानं शहाणा होऊं ?–म्हणजे काय करूं ? षंढासारखा दांत विचकून तुमच्या या असल्या जलशांत तुमची साथ करूं ?

[ भारती बेदरकार झाल्यासारखी संत्रस्त चेहऱ्याने प्रवेश करते. मार्तंडरावांचे प्रलाप तिला ऐकायचे नाहीत अशा त्वेषाने ती ऑर्गनसमोर बसून तो जोरजोराने वाजवूं लागते. मार्तंडराव आणखी मोठ्याने बोलतात–ती आणखी मोठ्याने तो वाजवते–अशी दोघांची चुरस चालल्यासारखें दिसतें ]

—आलीस ! माझा सूड घ्यायचा आहे, नाही का तुला ? घे ! मला छळून छळून, माझ्या संमतीनं माझाच जीव घ्यायचा आहे ? तुमची सगळयांची करमणूक करत मी मरणाच्या यातना भोगूं ?—अरे, तुम्ही कोण समजलांत मला ? मला यातना भोगूं द्या पण कसंहि करून जगूं द्या अशी याचना करणारा दीनवाणा, मुर्दाड नाही हा मार्तंडराव ! साऱ्या जगाच्या लाथा खात, तरी त्याचे पाय धरत, कण्हत, कुंथत, रडत, आरडत—मला नाही जगायचं हें मरतुकड्या कुत्र्यासारखं जगणं !—( भारतीच्या पाठीमागे तक्तपोस

असतो तिकडे जात हातांतील बंदूक सरसावून ती आपल्या छातीशीं भिडवून ) मार्तंडराव ! लाव छातीला माती ! ( बंदुकीचा आवाज होतो व ते तख्तपोसावर कोसळतात )

**भारती :** ( दचकून कानावर हात ठेवून किंचाळते ) आई ग ! ( मागे पहाते ) मेले ! ( खोलीभर सैरावैरा बेफाम झाल्यासारखी इकडून तिकडे तिकडून इकडे कांही काळ करत ) मेले ! मेले ! ( दारावर थापा वाजतात. ती तें उघडते आणि पुन्हा पूर्ववत् सैरावैरा हालचाल करूं लागते )

[ डॉक्टर, रसिकलाल आणि कुमार घाबरल्यासारखे प्रवेश करतात]

**कुमार :** ( प्रेताच्या छातीवर डोकें टेकून रडूं लागतो ) बाबा ! बाबा !

**रसिक :** काय झालं हो हें डॉक्टरसाहेब ! ( आपलें मस्तक आपल्या हातांनी पिटत कोचावर येऊन आदळतो ) अरेरे ! मी ! मी—मी कारण झालों हो या साऱ्या प्रकाराला ! अरे देवा रे !

**कुमार :** ( भारतीकडे पहातो. ती एकसारखी, थोडी गुन्हेगारासारखी, थोडी पिसाळल्यासारखी, बोटें चोळत, हात घासत, इथे उभी रहा, तिकडली वस्तु हातात घे, ती खाली टाक, दुसरी घे असें करत असते. रडव्या आवाजांत ) माई ! ( ती लक्ष देत नाही ) माई ! — डॉक्टरसाहेब ! माईकडे पहा हो ! कशी करते आहे ती ! काय होतंय हो हें सारं !

**डॉक्टर** : व्हॉट अ ट्रॅजेडी ! एका मिनिटाची चुकामूक झाली रे ! एवढ्यांत हा माझा संशय खरा ठरावा अं ! पण तुमच्या घरांत बंदूक असेल ही कल्पना कशी येणार मला !

**कुमार :** ( पुन्हा एकवार हुंदके देऊन ) माई ! डॉक्टरसाहेब ! पहा ना तिच्याकडे !

**डॉक्टर :** ( आतापर्यंत प्रेताच्या शेजारींच ते उभे असतात. थकलेल्या पावलांनी समोर कोचाकडे येऊन बसत असतांना ) हं ! कांटेरी कुंपणाच्या पलीकडचं मृगजळ पाहून ओढाळलेली एक हरिणी—( भारती एकदम डॉक्टरांच्या शेजारी येऊन थबकते. डॉक्टरांच्या ध्यानांत हें येतांच तेहि

स्तब्ध होतात. ती अत्यंत आतुरतेने त्याच्याजवळ हलकेंच जमिनीवर बसते, थोड्या वेळाने त्यांचा हात धरते, तो हालवते, पण डॉक्टर अगदी घट्ट बसले असतात— ती पुष्कळ प्रयत्न करते. )

**भारती** : ( शेवटीं खूप प्रयासाने बोलत असल्यासारखी तुटक शब्दांत )— मृगजळ पाहून ओढाळलेली हरिणी—काय झालं तिचं ? थांबलांत कां म्हणून ? तुमचा अखेरचा निर्णय ऐकूं द्या मला ! बोला ना !

**डॉक्टर** : ( एकेक शब्द मोजून ) काटेरी कुंपणाच्या पलीकडचं मृगजळ पाहून ओढाळलेली एक हरिणी, त्या कुंपणांत पाय अडकून कधीची जायबंदी झाली होती—तें कुंपण अखेर मोडून पडलं—हरिणीच्या धडपडीमुळेच मोडून पडलं —आणि या अनपेक्षित सुटकेनंतर सुटकेनंतरचं मृगजळ पाहून तिचा तोल तिला संभाळेनासा झाला आहे ! हें असंच होत असतं—

**रसिक** : ( हें तर्कदुष्ट विवेचन त्याला ऐकवत नसल्यासारखा ) पण डॉक्टरसाहेब ! ( भारती त्याच्याकडे चिडून पाहूं लागते ) केवढी भयानक आहे हो ही सुटकेची तऱ्हा ! या सुटकेसाठी बळी पडलेलं कुंपण जड, निर्जीव, काटक्या-कामट्यांचं का होतं ? एक सजीव, चालता-बोलता माणूसच होता ना तो ? दोन टिपं गाळण्याच्याहि योग्यतेचा नव्हता का तो ? ( पुन्हा हुंदके देऊं लागतो )

**भारती** : ( डोळ्यांतून निखाऱ्यांचा वर्षाव करीत ) माणूस ? कोण माणूस ? ( ताडकन् उठून मध्यभागीं उभी होते ) ढोरबाजारांतल्या जनावरासारखा एका बाईचा बाजारभाव करणारा तो पुरुष-तो माणूस ! अन् तेवढीच रक्कम देऊन त्या पुरुषाला तिचं दान करणारा तूं—तूं माणूस ! अभाग्या ! माझं सर्वस्व अर्पण केलं होतं रे तुला मी—पण माणुसकीचं खातं तूं अखेर आपल्या जमाखर्चाच्या चोपडींत उघडलंस ! बरोबर आहे—माणुसकीचा स्पर्श होतांच तुझ्या जातभाईंनी कावळ्यासारखं टोंचून खाल्लं असतं ना तुला !—म्हणून तुला तें पाप वाटलं !—

**रसिक** : अरेरे—काय बोलताहांत !

**भारती** : जा नीच ! नाहीसा हो माझ्या डोळ्यापुढून—नाहीं तर आता आणखी डोळे फुटतील माझे !

**रसिक** : डॉक्टरसाहेब ! अहो—

**डॉक्टर** : ( अगदी तळतळून ) अरे पण बोलूं दे ना तिला ! एकदां तरी बोलूं दे ! कां ऐकत नाहीस ! बोल बेटा, कसलीहि भीति न बाळगतां बोल ! तुझ्या साऱ्या स्फोटक विचारांची गर्जना आम्हाला एकदा तरी ऐकूं दे ! तुझ्या अंतरांतल्या अग्नीच्या ज्वाला फुटून बाहेर पडल्याशिवाय तूं शांत होणार नाहीस — आम्हालाहि तोंपर्यंत जीवन सह्य होणार नाही ! आमची सर्वांची, साऱ्या मानवजातीची धारणा करणारी–धरणी–माता––आहेस तूं ! बोल !

**भारती** : माता ! काय बोलताहांत तुम्ही !

––आम्ही कसल्या माता !
लाज वाटते आता !
आम्ही–एके काळच्या आर्या
आता त्यांच्याच भार्या होण्यास तळमळतों
जे झाले मस्त
मक्तेदारींत स्मशानाच्या
अधिकार ज्यांचा त्यांतल्या त्यांत जास्तींत जास्त
प्रेतांवर, भुताखेतांवर !

त्यांच्याच भागीदार होण्यास
सदा तयार !
— या असल्या भस्मासुराच्या
प्राणघेऊ प्रणयाचा वाजतांच शंख
आम्ही उपटतों पंख स्वातंत्र्याचे
स्त्रीत्वाचे, मातृत्वाच्या थोरवीचे
कानीं पडत असूनहि चोहींकडून ‘ सावधान ! सावधान ! ’
ठेचून सारा स्वाभिमान
खणून कबरस्तान आपल्याच हातांनी
तडफडत तरी सरपटत
शिरतों त्यांत
गुणगुणून ‘ प्राणनाथ ! ’

आणि म्हणूनच
म्हणूनच हा आमचा असा संसार
संसाराचा हा बाजार !
( हुंदके देऊन ढसढसा रडूं लागते )

**डॉक्टर :** ( विनम्र भावानें, थकल्यासारखे तिच्याजवळ जाऊन, तिचें सांत्वन करण्यासाठी तिचें डोकें आपल्या खांद्यावर टेकतात ) भारती ! ( तिला थोपटतात )

[ —पडदा— ]

## अखेरीस—

ज्या माझ्या मित्रांच्या अमोल सूचनांचा मला या नाटकाच्या लेखनाचे कामीं लाभ झाला त्यांचे—विशेषतः माझे ज्येष्ठ स्नेही श्री. वासुदेवराव भोळे, केशवराव पुरोहित, सौ. कुसुमावती देशपांडे आणि मो. ग रांगणेकर यांचे—आभार मानून

**—माझ्या 'भारती'ची भाषा ग़ाझ्या ज्या भगिनींना रुचेल-पटेल त्यांना हें नाटक अर्पण करीत आहे.**

गोखले व्हिला, कॉंग्रेसनगर,
नागपूर, २० जानेवारी १९५२

**नाना जोग**

# भारती

या नाटकाचा पहिला प्रयोग
विदर्भ साहित्य मंदिराच्या मदतीसाठी नागपूर नाट्य मंडळाने
रविवार ता. १७ फेब्रुवारी १९५२ रोजी व्ही. टी. आय्. हॉल, नागपूर
येथे केला.

उद्घाटक :
विदर्भाचे नाट्याचार्य वीर वामनराव जोशी, एम्. एल्. ए.

दिग्दर्शक : नाना जोग

भूमिका :
भारती : कु. भारती शर्मा
कुमार : मुकुंद जोग
रसिकलाल : मनोहर बर्वे
मार्तंडराव : वा. शं. ठाकुरदेसाई
डॉक्टर : नाना जोग

---

संगीत : प्रभाकर पातुरकर
र. ना. [illegible] मनेरकर
मधु कुंटे

---

पार्श्वसूचक : मधुकर कुंडले

---

सजावट : त्रिं. अ. चोरघडे

---

रंगभूमि : त्र्यं. ह. चाफेकर

---

नैपथ्य : शंकर मगरकर (नाट्य भूषा मंदिर, नागपूर)